सा ग र – सा हि त्य




# कु ळा ग र

गोमन्तकीय लेखकांच्या प्रादेशिक कथांचा संग्रह




संपादक व प्रकाशक

बा. द. सातोस्कर, बी. ए.

२५ ऑक्टोबर १९३७

प्रकाशक — बा. द. सातोस्कर, बी. ए.
सागर साहित्य कार्यालय, त्रिभुवन रोड, गिरगांव, मुंबई.

# सागर—साहित्य

प्रकाशित पुस्तकें

| कथासंग्रह | लेखक | किंमत |
|---|---|---|
| सागराच्या लाटा... | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई... | १ रुपया |
| गुलाब गेंद ...... | श्री. जयवंतराव सरदेसाई... | १२ आ. |
| वादळांतील नौका... | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई... | १ रुपया |

चार आणे प्रवेश—फी देऊन वर्गणीदार होणाऱ्या ग्राहकांस प्रत्येक पुस्तक पाऊणपट किंमतींत देण्यांत येतें.

मुद्रक — ब्र. मु. नाडकर्णी, बकुल आर्ट प्रिंटिंग प्रेस,
आंबेवाडी, गिरगांव रोड, मुंबई नं. ४

# प्र स्ता व

'सागर-साहित्या'चें चौथें पुस्तक म्हणून आज 'कुळागर' वाचकांच्या हातीं देण्यास मला आनंद वाटतो. वास्तविक पूर्वसंकल्पानुसार 'कुळागर' प्रसिद्ध होऊन 'साहित्या'चें आणखी एखादें पुस्तक बाहेर पडायला हवें होतें. पण संकल्पाच्या सखल मैदानांतून सिद्धीच्या पठारावर चढून जाण्याचा मार्ग अवघड डोंगर-दऱ्यांतून जात असतो, याचा प्रत्यय मला प्रस्तुत पुस्तकानें चांगलाच आणून दिला. माझ्या अडचणींचे पर्वत वाचकांच्या पुढें उभे करून मला माझी पडती बाजू सांवरून धरावयाची नाहीं. माझी बाजू पडली असलीच तर तसें होण्यास मी एकटाच जबाबदार नसून माझे लेखक-मित्रही ह्या 'सत्कार्यां'त समभागी आहेत ! कांहीं लेखकांच्या गोष्टी वेळेवर आल्या असत्या तर 'कुळागर'च्या प्रकाशनास एवढा अक्षम्य विलंब लागला नसता.

प्रस्तुतच्या प्रादेशिक कथासंग्रहाच्या प्रकाशनामागें कोणता हेतु आहे व कोणत्या भूमिकेवरून कथांची निवड केली आहे हें समजल्यास कथांशीं समरस होण्यास वाचकांस सुलभ होईल म्हणून थोडीशी चर्चा करण्याचें योजिलें आहे.

मडगांव येथें १९३० सालीं भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिवेशनाचे परिणाम गोमन्तकीय व इतर महाराष्ट्रीय यांच्यावर बरेच झाले. कांहीं परस्थांना पिग, पेग व प्रॉस्टिट्यूट या तीन 'पीं'नीं समृद्ध दिसलेला गोमन्तक, संमेलनोत्तर महाराष्ट्राचें नंदनवन व कलेचें माहेरघर वाटायला लागला. गोमन्तकांत प्रवेश करते वेळीं सामानाबरोबर माणसांनाही धुरी देत असल्याच्या अफवेंत, किंवा गोमन्तकांतील सर्वच स्त्रिया वेश्या आहेत ह्या समजांत गोमन्तकाच्या बदनामीचा सूर कसा वाहातो हें त्याच वेळीं गोमन्तकीयेतरांना समजून आलें. संमेलनाचा गोमन्तकीयांवर झालेला अप्रत्यक्ष परिणाम म्हणजे संमेलनोत्तर काळांत गोमन्तकीय लेखकांच्या प्रकाशांत आलेल्या कलाकृती. संमेलनानें ही क्रांति केली नसून उत्क्रांतितत्त्वानुसार ही गोष्ट घडून आली, असें कांहींचें मत असलें तरी गेल्या ५-६ वर्षांत गोमन्तकीयांचीं बरींच पुस्तकें बाहेर पडलीं, ही गोष्ट खरी !

वरील पुस्तकांवर निरनिराळ्या नियतकालिकांतून आलेल्या परीक्षणांत सरसकट प्रादेशिकतेचा शिक्का मारला जाई. वास्तविक ह्या पुस्तकांतील बहुसंख्य गोष्टी प्रादेशिक नसत. पण कुळागर, वाफोर, बल्कांव, श्री मंगेशाचा तळाव, ओंवळ, खेजू, ज्युलियु, असे कांहीं अपरिचित शब्द, स्थलांची वा पात्रांची नांवें दिसलीं कीं ती गोष्ट प्रादेशिक ठरे, आणि अजूनही ठरते. अशा वेळीं प्रादेशिक कथांचा एखादा संग्रह प्रसिद्ध करावा अशी मला कल्पना सुचली. अन् ह्या कल्पनेच्या पोटींच 'कुळागर' चा जन्म झाला.

ह्याच ठिकाणीं प्रादेशिकतेची कसोटी ठरविणें अप्रस्तुत होणार नाहीं. एखाद्या विशिष्ठ प्रदेशाचें अंतरंग व बहिरंग ज्या वाङ्मयांत प्रतिबिंबित झालें आहे तो प्रादेशिक वाङ्मयप्रकार होय. इथें प्रदेशाचें बहिरंग म्हणजे निसर्ग व अंतरंग म्हणजे मानवी स्वभाव व जीवन होय असें सूत्ररूपानें सांगतां येईल. ह्या व्याख्येंत एक दोष दिसून येण्याचा संभव आहे. प्रदेशाचें बहिरंग स्थानपरत्वें बदलणें शक्य असलें, तरी त्यांतील मानवी स्वभाव स्थलभिन्नतेमुळें कसा बदलणार ? मानवी स्वभाव जर असा स्थलपरत्वें बदलूं लागला, तर ज्या एका महत्त्वाच्या निकषावर अक्षर वाङ्मयाची कसोटी लावली जाते तो निकषच नाहींसा होण्याचा अनवस्था प्रसंग ओढवेल ! मनुष्याच्या ठिकाणीं प्रेम, वात्सल्य, राग, द्वेष, मोहादि जे स्थायी भाव आज आहेत, त्यांचें अस्तित्व व आविष्कार करण्याची प्रवृत्ति सर्व कालीं व सर्व स्थलीं सारखीच आहे. आणि म्हणूनच शेक्सपीयर–इब्सेनचीं नाटकें युरोपेतर जगांत व कालिदास–टागोरच्या कलाकृती युरोपांत आवडीनें वाचल्या जातात. व्हेनिसमधला अथेल्लो ज्या परिस्थितींत डेस्डिमोनाचा खून करतो त्याच प्रकारच्या मनोवृत्तींच्या चक्रव्यूहांत सांपडला असतांना महाराष्ट्रांतील एखादा झुंजाररावही तेंच करतो ! पंजाबांतील एखाद्या शिखापुढें अकस्मात् वाघ येऊन उभा राहिला तर जशी त्याची भीतीनें गाळण उडेल, तशीच एखाद्या मद्राशाचीही बोबडी वळेल ! बंगाली बाबू भावनात्मकतेच्या आहारीं जाऊन जें कृत्य करील, तेंच कृत्य त्याच परिस्थितींत एखादा गोवेंबाबूही करील ! मग विशिष्ट प्रदेशाचें प्रादेशिकत्व तें कुठें राहिलें ?

सकृद्दर्शनीं जरी हा आरोप खरा असावा असें वाटलें, तरी सूक्ष्म विचार

केल्यास त्याची कच्ची बाजू तेव्हांच समजून येते. मनुष्याच्या प्रमुख भावना जरी सर्व कालीं व सर्व स्थलीं सामान्यच असल्या तरी परिस्थितिभिन्नत्वानें त्यांच्या उत्कटतेंत फरक होऊं शकतो. सरहद्दीवरील पठाणांची स्वातंत्र्यप्रियता, बंगाल्यांची भावनाप्रवणता, मारवाड्यांचा कंजुषपणा, अरबांचा भटकेपणा व आफ्रिकन नीग्रोंचें क्रौर्य हीं सर्व निसर्गभिन्नतेमुळेंच मानवी स्वभावांत बदल झाल्याचीं उदाहरणें नव्हेत का ? निरनिराळ्या प्रदेशांतील विशिष्ठ भौगोलिक परिस्थितीमुळें मनुष्याच्या कांहीं भावनांना उत्कटता प्राप्त होते व त्या त्या प्रदेशांतील लोकांची ती ती भावना सांघिक गुण किंवा अवगुण ठरते. आक्षेपकांच्या बाजूनें वर दिलेलीं उदाहरणें पुन्हां घेऊनच ही बाजू मांडतां येईल. पंजाबी माणसापुढें वाघ उभा राहिला तर मद्राशाप्रमाणेंच तोही गर्भगळित होईल असें आपण म्हटलें. पण भीतीनें गाळण उडण्याऐवजीं आधीं कंबरेचें किरपाण काढून तो वाघाशीं दोन हात करण्याची तयारी करील हें जास्त संभवनीय नव्हे का ? बंगाल्यांच्या व गोमन्तकीयांच्या भावनात्मकतेंतही फरक हा आहेच. शंभर वर्षांच्या पारतंत्र्य—कालांत माणिकतोळा प्रकरणासारख्या स्वातंत्र्यसंपादनार्थ बंगाल्यांनीं केलेल्या प्रयत्नांचें रक्तरंजित चित्र, आणि चारशें वर्षेपर्यंत 'पितृदेशा'च्या सुखाच्या सांवलींत समाधानानें कालक्रमण करीत असलेल्या गोमन्तकीयांचे हालचाल न करणारे मेणाचे पुतळे, हीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे मनुष्यस्वभाव घडविण्यांत निसर्गाच्या भिन्नतेचा किती परिणाम होतो हें स्पष्टपणें दिसून येतें. स्थलभिन्नतेमुळें मानवी स्वभावाप्रमाणेंच मानवी जीवनांतही फरक होतो हें प्रमेय सिद्ध करण्यास उदाहरणांची सुद्धां अवश्यकता नाहीं. राहाणी, पोशाख, सामाजिक चालीरिती, भाषेंतील वर्णांचें न्यूनाधिक्य व उच्चारसौकर्य, ह्या बाबींचा नुसता उल्लेख करूनच हा फरक सूचित करतां येईल.

आणि स्थलभिन्नतेमुळें मानवी स्वभावघटनेंत व मानवी जीवनांत बदल होतो हें एकदा कबूल केलें म्हणजे प्रादेशिक वाङ्मयाचें अस्तित्व व आवश्यकता मानणें क्रमप्राप्त ठरतें. आणि जोंपर्यंत मानवी जीवनांतूनच प्रसंग वा पात्रें घेऊन कलेला शृंगारावी लागते, तोंपर्यंत प्रत्यक्ष जीवनांतील व मानवी स्वभावांतील हा फरक वाङ्मयांतील त्यांच्या प्रतिबिंबांतही दिसल्यावांचून कसा राहील ?

वाङ्मयांतील ह्या बदलणाऱ्या प्रतिबिंबालाच प्रादेशिकता म्हणतात.

ललित वाङ्मयांत ही प्रादेशिकता आणण्याचे दोन मार्ग आहेत. प्रदेशाच्या बहिरंगाच्या वर्णनानें व अंतरंगाच्या दर्शनानें. ठायीं ठायीं कथानकस्थळ बनलेल्या प्रांतांतील निसर्गाचें वर्णन करून, तेथील विशिष्ठ बोलींतील शब्दांचा व वाक्प्रचारांचा सुंदर उपयोग करून व तिकडील लोकांच्या पोषाखाचें, चालीरितींचें मार्मिक व प्रसंगोचित वर्णन करून प्रादेशिकता आणतां येते. पण याहीपेक्षां प्रभावी मार्ग म्हणजे तेथील शहरें–खेड्यांतून जीं माणसें वावरतात त्यांचीं वास्तव चित्रें वाङ्मयांत चितारणें हा होय. इंग्रजी वाङ्मयांत थॉमस हार्डी हा एक उत्कृष्ट प्रादेशिक कादंबऱ्या लिहिणारा लेखक होऊन गेला. हार्डीनें ज्या वेसेक्स परगण्यांत आपल्या पात्रांच्या हालचाली घडवून आणल्या आहेत त्या प्रांतांतीलच तीं माणसें असल्याचा भास होतो असें टीकाकारांचें मत आहे. हार्डीला प्रादेशिक कादंबरीकार न मानतां सार्वकालीन मानवी स्वभावाच्या भूमिकेवरच त्यानें आपलीं पात्रें निर्माण केलीं असून वेसेक्स परगण्याचा उपयोग पार्श्वभूमीदाखल केलेला आहे असें म्हणणारेही टीकाकार आहेत. पण प्रस्तुत वादांत शिरण्याचें आपणास प्रायः कारण नाही.

जी गोष्ट प्रांतांतील एखाद्या लेखकाची, तीच तेथील इतर लेखकांची. लेखक हा समाजाचा एक घटक असल्यामुळें समाजाच्या स्वभावांत व जीवनांत जो फरक निसर्ग घडवून आणतो, तोच लेखकांतही दिसून येतो. ह्या दृष्टीनें एखादा प्रांत घेऊन त्यांतील लेखकांच्या लिखाणावर तेथील भौगोलिक परिस्थितीचा कितपत परिणाम होतो हें पाहाण्याकरतां एखादा प्रयत्न होणें इष्ट होतें. प्रयोगादाखल प्रयत्न म्हणून ' कुळागर ' प्रसिद्ध करण्याचें मी ठरविलें. पण माझा हा प्रयत्न फारसा उत्तेजनपर नाहीं असें मला आढळून आलें. खऱ्या प्रादेशिक अशा फार थोड्या कथा आमच्या लेखकांनीं लिहिल्या आहेत. त्यामुळें प्रादेशिकतेच्या धोरणाची पकड थोडीशी सैल करावी लागली. तरी पण प्रस्तुत संग्रहांत संग्रहित केलेल्या कथांची निवड विशिष्ठ हेतूनेंच केली आहे एवढें मात्र मला सांगतां येईल. पहिल्याच श्री. बर्वे यांच्या कथेंतील पार्श्वभूमि जरी पोर्तुगाल असली, तरी १६व्या शतकांत गोमंतकांत झालेल्या बाटाबाटीच्या वेळीं पोर्तुगीजांकडून करण्यांत आलेल्या अनन्वित छलाची कल्पना सुद्धां

सदर्हू गोष्टीवरून येत असल्यामुळें ती घेण्यांत आली आहे. श्री. यशवंतराव सरदेसाई यांची कथा ध्येयवादी म्हणून, श्री. 'सुनीळ' व प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई यांच्या ३० वर्षांपूर्वीच्या वास्तवकथा म्हणून, श्री. बोरकर यांची 'ओझरती झळ' एक समाजदृश्य म्हणून, श्री. जयवंतराव सरदेसाई यांची ' आठवणींचे अवशेष' ही कथा गोमन्तकांतील वेश्याव्यवसायाची तर्कनिष्ट विचारसरणीनें मांडलेली एक प्रकाशमान बाजू म्हणून, श्री. ह. वि. देसाई यांची गोमंतकांतील श्रद्धाळू भूमींतही विचारक्रांतीचीं बीजें अंकुरतात याचें उदाहरण म्हणून संग्रहित केल्या आहेत.

जातां जातां कांहीं ठिकाणीं आलेल्या कोंकणी शब्दांबद्दल खुलासा करणें जरूर आहे. प्रादेशिकतेचा छाप मारण्याकरतां मधून मधून निरर्थक प्रांतिक शब्द घुसडून देण्याच्या प्रथेचा अवलंब प्रस्तुत पुस्तकांत करण्यांत आला नाहीं. ज्या कोंकणी शब्दाला मराठींत समानार्थी शब्द नाहीं, किंवा तसा शब्द असूनही कोंकणी शब्दांच्या उपयोगानें लालित्यांत वा अर्थव्यक्ततेंत भर पडत असेल, प्रादेशिक वातावरण निर्माण करण्यासाठीं, किंवा क्वचित् लेखकाच्या अत्याग्रहाखातर कोंकणी शब्दांचा उपयोग करण्यांत आला आहे. अशा प्रकारें कांहीं शब्दरत्नांची मराठीच्या कोषागारांत भर पडली तर ती आपल्याला आज हवीच आहे !

' कुळागर ' म्हणजे पोफळींची बाग. आणि त्याचें वैशिष्ट्य म्हणजे बारमाही गारवा नी हिरवेंचार दृश्य ! प्रस्तुत 'कुळागर' वाचकांना कांहीं काल तरी व्यवहाराच्या तापांतून आनंदाच्या सावलींत आणून सोडील मला अशी आशा आहे.

सुरवातीलाच कांहीं लेखकांनीं गोष्टी पाठविण्यांत उशीर केल्याचा उल्लेख केला. पण वर्ष–वर्षभर माझ्याकडे अप्रकाशित गोष्टी ठेवण्याचें सौजन्य माझे मित्र श्री. के. ना. बर्वे व श्री. महादेवशास्त्री जोशी यांनीं दाखविलें आहे. कोणत्या शब्दांनीं मी त्यांचे आभार मानूं ? इतर लेखकांनींही सवडीप्रमाणें गोष्टी पाठवून मला उपकृत केलें आहे. ' कुळागर ' च्या मलपृष्ठावरील चित्र माझे मित्र श्री. स. पु. दणाईत यांनीं प्रकृतीचें अस्वास्थ्य असतांनाही त्वरित काढून दिलें व ' बकुल आर्ट प्रिं. प्रेस'चे मालक श्री. ब. मु. नाडकर्णी यांनीं ' कुळागर ' ची छपाई अल्पावधींत सुंदर करून दिली, याचा साभार उल्लेख करणें जरूर आहे.

मुंबई ता. २०–१०–३७ बा. द. सातोस्कर

# कथानुक्रम

# धर्मसमीक्षण !

श्री. केशव नारायण बर्वे.

[ धर्मप्रसाराच्या सोंवळ्या नांवाखालीं, ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांनीं एके काळीं खुद्द पोर्तुगाल देशांत व गोमंतक प्रांतांत जो हैदोस घातला व अनेक स्त्रीपुरुषांचे अनन्वित छलपूर्वक बळी घेतले, त्याचें वर्णन इतिहासविख्यात आहे. प्रथितयश पोर्तुगीज कादंबरीकार कामीलु कास्तॅलु ब्रांकु (Camilo Castelo Branco) यांच्या उपर्युल्लिखित विषयावरील एका कादंबरीच्या आधारें, अशाच एका रोमांचकारी प्रसंगाचें वर्णन प्रस्तुत कथेंत अनुस्यूत केलें आहे. ]

त्या दिवशींचा नभःप्रांत शुद्ध किरणराशींनीं प्रकाशित झाला. १२ सप्टेंबर १७०६ हा तो दिवस होय. सां दुमिंगुस् ( S. Domingos ) नामक भव्य इगर्जींत (चर्च) प्रचंड घंटानाद सुरू झाला. किनखापाच्या उंची वस्त्रांनीं भूषविलेल्या रथांस आभरणालंकृत असे अश्व जोडले गेले, व त्यांच्या तर्फांच्या पिछाडीस श्रीमंत लोकांच्या विविधरंगी पोषाखांनीं नटविलेल्या चाकरांचे गट शिस्तवार उभे करण्यांत आले.

इगर्जीसमोरील भव्य मंडपांत लोकांची नुसती झुंबड उडून गेली. आणि जिकडून तिकडून येणाऱ्या आबालवृद्धांच्या रांगा मुंग्यांच्या माळांसारख्या भासूं लागल्या. इगर्जींतील घण्टानिनाद दुःखनिदर्शक असले, तरी तो दिवस मात्र समारंभाचा—धार्मिक विजयोत्सवाचा होता ! राजाधिराज दुसरे दाँ पेद्रु ( D. Pedro II ) आपल्या लव्याजम्यासहवर्तमान इगर्जीपुढील पटांगणांत दाखल झाल्यावर, सर्वत्रांनीं आपापल्या रिवाजानुसार त्यांना उत्थापन दिलें, व अग्रभागीं तयार करून ठेवलेल्या सिंहासनावर ते विराजमान झाले. राजाच्या आसनालगतच,

पण विशेष खुलून दिसेल अशा एका उच्चासनावर, पाद्री फ्रांसीस्कु द सांत मारीय ( Padre Francisco de Santa Maria ) कीं, ज्यांच्या धार्मिक एकनिष्ठतेची ख्याति आसमंतांत झालेली, व विशेषतः Evangelho या प्रमाण ग्रंथाचे विद्वान चिकित्सक म्हणून ज्यांना ओळखण्यांत येत असे—हे त्या आसनावर आरूढ झाल्यावर, सभेंत घनगंभीर अशी शांतता पसरली. अपराधी इसमांची दावण मोठी होती. त्यांपैकीं कित्येकांच्या वांट्याला हद्दपारी तर कित्येकांना सदाबंदी, कांहीं जणांना गळफांस तर कांहीं जणांना जलोच्छ्वास, आणि उरलेल्यांना अग्निकुंड, याप्रमाणें शिक्षा व्हावयाच्या होत्या. ही घटना पूर्वीच ठरून गेली होती. फक्त लौकिकरीत्या गुन्हाशाबिती आज होणार होती !

भावी अनर्थाच्या भयानक कल्पनेनें ज्यांच्या मुखमंडलावर स्वेदबिंदु चमकताहेत, अशा कांहीं भयविव्हल 'पाप्यांना' 'पवित्र कार्या'चे (Santo oficio) सेवक, दंडाला धरून खेंचून आणीत होते. या सेवकांच्या अंगांत, जणुं दुःशासनाचा विजयोन्माद संचरला होता! या 'पाप्यां'च्या पंगडांत एक अठ्ठावीस वर्षांचा नवयुवक धिमेपणानें चालत होता. त्याच्या चेहऱ्यावर उद्वेग, तितीक्षा, क्रोध, गांभीर्य यांचें मिश्रण झालेलें दिसत असून, विशिष्ट तऱ्हेनें होणारा भृकुटिभंग, त्याच्या मस्तकांतील खवळलेल्या विचारसमुद्राचें विशदीकरण करीत होता. दीर्घबंदीवासामुळें, त्याच्या मुद्रेवर जरत्कारूची अवकळा आलेली असली, तरी भालप्रदेशावरील तडतडणाऱ्या शिरा दृढनिश्चयाची साक्ष देत होत्या. हेय्तोर दीयस् द पाज (Heitor Dias de Paz) हें या सुविद्य व तडफदार तरुणाचें नांव.



धर्मसमीक्षणाची ( Inquisition ) ती सभा जितकी प्रचंड तितकीच भीषणरम्य दिसत होती. राजेरजवाडे, मंत्री, सरदार, दरकदार, मानमानकरी, धर्माधिकारी, बिशप, आर्चबिशप, इत्यादि सभागण, आपापल्या माननीय स्थानांवर बसलेले असून, इतरेजन गंभीर मुद्रांनीं पण उत्कंठित अंतःकरणांनीं, दुतर्फा बसले होते. दरम्यान् द्वारपालांनीं मोठी ललकारी दिली, व शूर सैनिकांनीं नागव्या तरवारीच्या द्वारें तिला दुजोरा दिला. धर्मसमीक्षणाचे कार्यवाह न्यायासनाजवळ

जाऊन उभे राहिले. आणि अपराध्यांच्या गुन्ह्यांची माहिती वाचण्यास त्यांनीं प्रारंभ केला. सुमारें पन्नास पानांचा एक लांबलचक निबंध वाचून संपविल्यावर, या तरुणाकडे त्यांनीं दृष्टि वळवली व पुनः वाचनास सुरवात केली.

—धर्मसमीक्षण सभेचे अधिकृत सभासद ! हेय्तोर दीयस् द पाज यांचें आचरण, त्यांच्यावरील आक्षेप, कैफियत, व पुरावे हीं पडताळून पाहिल्याअंतीं आरोपी हेय्तोर हे सर्वथैव शिक्षेस पात्र आहेत, असा अभिप्राय देतात. आरोपी हे एक नव क्रिस्तांव असून व्हील-फ्लोर ( Vila-flor ) येथें रहाणाऱ्या फ्रांसीस्कु मोराईस ( Francisco Morais ) या यहुदी गृहस्थांचे ते पुत्र होत. यांचा वडिलोपार्जित व्ययसाय व्यापाराचा असला, तरी स्वतः हेय्तोर हे विश्वविद्यालयाचे नामांकित विद्यार्थि आहेत. यांना ' पवित्र ' अशा कॅथोलिक धर्माचा बाप्तिस्मा दिला गेल्यानंतर, या पवित्र धर्माज्ञेनुसार, व रोम येथील महनीय धर्ममठाच्या नियमांस अनुसरून सर्व यमनियम अत्यंत भक्तिभावानें पाळणें, हें त्यांचें कर्तव्य होतें. परंतु त्यांचें वर्तन याच्या अगदीं उलट असें होत आहे. त्यांची मॉइझेस ( Moises ) वरची श्रद्धा काडीइतकीही कमी झालेली नसून, त्याच्याच वचनाबरहुकूम उपासतापास, व्रतवैकल्यें करण्यांत त्यांना अभिमान वाटतो ! इतकेंच नव्हे तर, दिवसा अन्नग्रहण न करतां तें रात्रौ नक्षत्रदर्शनानंतर करणें, आहारांत डुकर, ससा, इत्यादि जनावरांचें मांस येऊं न देणें, रविवाराऐवजीं शनिवार हाच विश्रांतीचा दिवस पाळून, त्या दिवशीं स्वच्छ व उंची वस्त्रें वापरणें, Adonai, Deus de Abraham, Isac आणि jacob यांची प्रार्थना, वगैरे अनेक ख्रिस्तधर्मनिषिद्ध अशीं कर्में ते करतात. या गर्हणीय कृत्यांसाठीं, त्यांना या ' पवित्रकार्यालयाच्या ' बंदीगृहांत आणून, सदर दुष्कर्मांपासून परावृत्त होण्यासाठीं परोपरीनें उपदेश करण्यांत आला. पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. उलट त्यांचा दुराग्रह वाढतच आहे, ही खेदाची गोष्ट होय. एक सुविद्य माणूस, त्या मॉइझेसच्या खोट्या आज्ञांवर विश्वास ठेवून नाहक रौरवांत जाणार, हें लक्षांत घेऊन, ख्रिस्ताच्या सत्य व स्वयंप्रकाशित धर्माची दीक्षा हेय्तोर यांना देण्यांत आली, आणि या धर्मपालनांतच अखिल मानवजातीचें इहपर सौख्य आहे, असें केवळ परोपकारबुद्धीनें त्यांना उपदेशिण्यांत आलें.

पण व्यर्थ! सारांश, हेय्तोर यांची मॉइझेसवरील अढळ श्रद्धा, खिस्तावरील अश्रद्धा, व तदनुसार वागणूक, हीं जमेस धरलीं म्हणजे ते खिस्तद्रोही ठरतात. म्हणून घोर अशा प्रकारच्या शिक्षेस ते पात्र आहेत असें ठरतें. तथापि, त्यांचें शिक्षण व वय यांकडे नजर देऊन, त्यांस प्राणनाश, किंवा रक्तशोषण यांसारखें क्रूर शासन दिलें जाऊं नये, अशी इच्छा व्यक्त केल्याखेरीज रहावत नाहीं.

शासनाबाबतची ही मानभावी आकांक्षा ऐकून, हेय्तोरच्या कपाळावर विशिष्ट हेतुनिदर्शक अशा ईषद्रेषा उमटल्या; व त्यानंतर एक प्रकारच्या उपेक्षा-बुद्धीनें त्यानें विकट हास्य केलें. मठीय सेवकांनीं त्याला उठून उभा रहावयास सांगून, अग्रस्थानीं मोठ्या आढ्यतेनें विराजमान झालेल्या बारा धर्माधिकाऱ्यांपैकीं एकाच्या पदांबुजीं लीन होण्यास आज्ञापिलें. हेय्तोरनें मस्तक उंचावलें व सर्वांना ऐकूं जाईल अशा कणखर आवाजांत तो उत्तरला,

— एका परमेश्वराखेरीज कोणालाही अभिवादन करण्याची माझी खुषी नाहीं!

या वाक्यानें सर्व सभा थोडीशी विचलित झाली. जिकडून तिकडून 'कोण ही दर्पोक्ति!' अशा आशयाचे शब्दोच्चार अस्पष्ट आवाजांत उमटले. पण पुढें लौकरच ही चुळबुळ थंडावली. कारण, पाद्री फ्रांसीस्कु यांची मूर्ति अधिकारोन्मादाच्या अभिनिवेशांत व्यासपीठावर प्रगटली.

व्यासपीठावर आल्यानंतर पाद्रीसाहेबांनीं सभोंवार नजर टाकली, व शेवटीं दृष्टीचा रोंख हेय्तोरकडे केंद्रीकृत करून प्रवचनास प्रारंभ केला.

—हे इस्रायलच्या अंधभक्तांनो! सर्वशक्तिमान अशा त्या परमेश्वरास साक्षी ठेवून, केवळ आमच्या दिव्य धर्माच्या मोहबतीखातर आणि तुम्हांसारख्या अंधांना दृष्टिलाभ व्हावा, एतदर्थ मी तुम्हांसमोर हें भाषण करीत आहें. यांत कोणाला दुखविण्याचा माझा इरादा नाहीं. तथापि, स्पष्टोक्तीच्या भरांत जर एखादा वातुळ शब्द निघून गेला, तर त्याबद्दल तुम्ही हेत्वाभास उत्पन्न करूं नये.

—आम्ही मूर्तिपूजक व तुम्ही निर्गुणोपासक असें असतां, त्या देवानें आम्हांवर सर्व चांगल्या वस्तूंचा पाऊस पाडून, तुम्हांवर शतकानुशतकेंपर्यंत दुःखवर्षाव करीत रहावें, यांत काय दिसून येतें? पितृदेश, इभ्रत, राजा, धर्माध्यक्ष, धन्वन्तरी, दळभार, न्यायदाता, देव, धर्म या सर्वांना तुम्ही पारखे होऊन श्वान-

सूकराच्या जिण्यानें रानोमाळ भटकतां, यांत तुमच्या धर्माचा कमकुवतपणाच उघड होत नाहीं काय ? आम्हां खिस्तानुयायांना या सर्व गोष्टी अनुकूल आहेत. अर्थात् देव आम्हांलाच प्रसन्न झाला आहे यांत काय संशय ? दरसाल तुमच्यांतील अनेक माणसें वधस्तंभावर लटकलीं जातात; पण एखाद्या प्रसंगीं तरी, देव तुमच्या हांकेला पावला आहे का ? De malo ad malum egressi Sunt !

—आतां अल्पावधींतच तुम्हांला अग्निदिव्य करावें लागेल. पण त्याबद्दल तुम्ही खेद मानूं नका. कारण या जगांत प्रत्येक वस्तु नाशवंत आहे. मग माणसाला मरण यावें यांत कोणतें नवल ? तत्वतः मरण हें वाईट नाहीं. तर पातकी मरण हें मात्र निंद्य होय. तुम्ही इतकीं वर्षे पापाचरणांत घालवून स्वतःचें नुकसान करून घेतलें. तथापि अखेर आमच्या धर्माज्ञेप्रमाणें अग्निप्रवेशारूपानें तुम्हांला दिव्य मृत्यू लाभत आहे. हा खरोखरच तुमचा भाग्योदय होय. वास्तविक अनन्तकालपर्यंत नरकवासांत खितपत पडावें, अशीं तुमचीं घोर कर्में ! पण या ‘ पवित्रकार्या ’ कारणीं तुमचा देह लागत असल्यामुळें त्याचें सोनें होत आहे. फार काय, परंतु अंतीं आमच्या पवित्र धर्मांतील जें परमोच्च स्थान तेंही तुम्हांला त्या दुर्मिळ स्वर्गराज्यांत मिळेल यांत तिळप्राय संदेह नाहीं. तो प्रत्यक्ष परमेश्वरच माझ्या मुखांतून हा संदेश तुम्हां अज्ञजनांना पोंचवीत आहे !

हेग्तोरचे करारी पण हतप्रभ झालेले ओष्ठद्वय क्षोभातिरेकामुळें किंचित् विलग झाले. पण पाद्रीसाहेबांच्या मोहक वक्तृत्वानें मंत्रमुग्ध झालेल्या सभासदांना मात्र तें उपहास्य वाटलें.

—वधस्तंभाकडे जातांना हा बेवकुब कितीसा हांसतो तें पाहिलें पाहिजे !— एक तीक्ष्ण आवाज उमटला.

सभेंत निःस्तब्ध शांतता पसरली नी सर्वांच्या नजरा हेग्तोरवर एकवटल्या.



धर्मद्रोही माणसांची ती तुकडी ‘ पवित्र कार्यालया ’ च्या एका दिवाण-खान्यांत आणली गेली. न्यायमूर्तींनीं सर्वांचे निकाल वाचले. ( अर्थात् ते आगाऊच लिहून ठेवले होते ! ) हेग्तोरच्या निकालाची पाळी आली. त्याला जवळ बोलावून घेतल्यावर पुढील प्रश्नोत्तरें झालीं.

—हेग्तोर दीयस द पाज या नांवाचा पतित व ख्रिस्तधर्मद्रोही इसम तो तूंच ना ?

— होय !

—तुझें वसतिस्थान कोणतें ?

—व्हीला—फ्लोर

—Padre, Filho, Espirito Santo, या त्रयीवर तुझी श्रद्धा आहे काय ?

—नाहीं !—इतकें बोलून हेग्तोर नीट उभा राहिला.

—तुला तुझा निकाल ऐकण्यासाठीं गुडघे टेकून राहिलें पाहिजे.

—मी तो उभ्यानेंच श्रवण करीन.

—ऐक तर मग. 'हेग्तोर दीयस् द पाज या इसमाची स्वधर्मावरील अंधश्रद्धा, ख्रिस्तधर्मपराङ्मुखता, चढेल वृत्ति, आणि दुर्दमनीय महत्त्वाकांक्षा, हे दोष लक्ष्यांत घेऊन, ख्रिस्तद्रोहाच्या अक्षम्य पापक्षालनार्थ, सदर इसमास तापलेल्या लोहस्तंभास बांधून जिवन्त जाळण्याची सजा दिली जात आहे. या इसमाची जी कांहीं स्थावर वा जंगम जिंदगी असेल ती ताबडतोब सरकारजमा करावी, व या हुकुमाची तामिली आज सूर्यास्तापूर्वी व्हावी.'

हेग्तोरनें एक दीर्घ निःश्वास सोडला. निकाल कानावर पडल्यानंतर तेथें जो एकंदरींत देखावा दिसला, तो अत्यंत करुणाजनक असा होता. कांहीं बाया आपल्या बालकांचीं चुंबनावर चुंबनें घेऊन अश्रुपात करीत, तर कांहीं माता अर्भकांना अखेरचें स्तनपान देतांना मूकरुदन करीत. कारण, मनमोकळेपणानें रडण्याचीही तिकडे मुभा नव्हती तात्पर्य, जिकडे तिकडे आक्रंदन नी निःश्वास यांचेच पडसाद घुमत होते.

इतक्यांत, ठरलेली घटका भरली. पवित्रगृहाचे दूत येऊन त्यांनीं त्या मातांकडून तीं अर्भकें हिसकावून घेतलीं ! संगिनींच्या बंदोबस्तांत वध्य माणसांचा तो जथा वधस्थलाकडे रवाना झाला. या मेळाव्याच्या मधोमध हेग्तोर सावकाश, मंदमंद पावलें टाकीत चालला होता. मालवणारी ज्योत ज्याप्रमाणें मधून मधून प्रज्वलित व्हावी, तद्वत कसल्यातरी गूढ संवेदनांचें तेज त्याच्या

मुखश्रीवर झळकत होतें. त्याचें हृत्कंपन मात्र किती वेगांत चाललें होतें, याची कल्पना करणें कठिण! आणि हा सर्व देखावा दोन्ही बाजूंच्या खिडक्यांतून स्त्रीपुरुषांचे छोटे छोटे जमाव अगदीं तटस्थतेनें अवलोकन करीत होते.

अशा थाटांत ती मिरवणूक चालली असतां, अकस्मात् एका दरवाजांतून एक वृद्ध मनुष्य कोलमडून रस्त्यावर पडला. हा वृद्ध म्हणजे हेग्तोरचा पिता. यद्यपि, 'कृतांतकटकामलध्वजजरा' या स्थितिप्रत तो पावलेला होता, तरी पण त्याच्या मनाचा खंबीरपणा स्पृहणीय होता. पित्याला पाहतांच, पुत्राच्या अंतःकरणांत विलक्षण कालवाकालव झाली. कांहीं शब्ददेखील त्याच्या जिव्हेवर घुटमळले पण ते बाहेर मात्र पडले नाहींत. त्यांचीं हृदयें जणु आपापसांत बोलत होतीं. म्हातारा गद्गद् स्वरांत उद्गारला,—प्रिय पुत्रा, तुझा विजय असो! क्षणार्धांतच तुझ्या मातोश्रीला तुझ्या आगमनाची वार्ता मी स्वतः परलोकांत पोंचती करीन. आणि तेथेंच आम्ही सर्वजण त्या वंद्य अब्राहमच्या सान्निध्यांत मोकळया अंतःकरणानें खूपखूप बोलूं.

पुत्रानें उत्तर केलें,—पिताश्री आपलें धैर्य आणि शांति विशाल आहेत. अल्पावधींतच आपण एकमेकांना भेटूं!

म्हाताऱ्यानें बरोबर आणलेल्या कुपींतील जहरी औषध प्राशन केलें व क्षणार्धांतच इहलोकची यात्रा संपविली. त्याच क्षणीं हेग्तोरच्या तीव्रतर यातनांना प्रारंभ झाला. पण त्या फार वेळ टिकल्या नाहींत. कारण, स्वर्गांत मातापितरांना तिष्ठत ठेवणें त्याला उचित नव्हतें. अल्पावकाशांतच त्याचें प्राणोत्क्रमण झालें; नी त्या 'पवित्र' धर्मानें बलिग्रहणाचें अर्धशतक पुरें केलें!

आणि त्या समयींचा मावळता सूर्यनारायण पश्चिम क्षितिजावर आपल्या आरक्त किरणांनीं अधिकच शोभायमान दिसत होता. राजाधिराज आपल्या महालांत विलासमग्न होते. व सां दुमींगुस इगर्जीच्या पाद्रीमंडळाची सायंप्रार्थना चाललेली होती!

धर्मसमीक्षण
केशव ना. बर्वे

कुळागर

# दिवटीचा प्रकाश

श्री. यशवंतराव सु. सरदेसाई

'पराक्रमी बहु भारी झाले राणे सांखळी नगरीं ॥ धृ० ॥ प्रथम ते शृंगारपुरींचें ॥ राजे सूर्यवंशींचे साचे भक्त पंढरी रायाचे ॥ सत्य साच वचनाचे भावें भजती विठ्ठल श्री हरी ॥ पराक्रमी बहु भारी०॥ १ ॥'

चांदणें दाट पिठासारखें पडलें होतें. फोंडु गांवसाच्या अंगणांत कुळवाडी जातींतील कांहीं उमेदवार तरुण तालगडी खेळत होते. शिमग्यांतल्या उत्सवाचे दिवस जवळ येत चालले होते, तसतशी खेळाची ही 'झडती'× रात्रभर चालू असे. अशाच एका 'थोर रात्रीं' वरील लावणी चालू होती. शेणानें सारवलेल्या अंगणाचे मेरेवर बरीच प्रौढ मंडळी बसली होती. यंदा उत्सवास कोणता नवा प्रकार करावा, कोणत्या नाटकमंडळीस आमंत्रण द्यावें, कोणत्या प्रकारें देऊळ शृंगारावें, याचा ती आपसांत विचार करीत होती. पलीकडे सोप्यावर कांहीं बायका उभ्या राहून आपापल्या मुलाभावांचा नाच पहात होत्या. तरुणांनीं फेरा धरला होता. आणि मध्यें एक वयातीत माणूस उभा राहून हातानें घुमट* वाजवीत व तोंडानें सुरेल स्वर काढीत, सुप्रसिद्ध गोमंतकीय शाहीर गोंदजी नाईक यांनीं रचलेली लावणी शिकवीत होता. बाकीचे नाचत नाचत एकमेकांच्या हातास हात लावीत व रुमाल उडवीत ती म्हणत होते.

'त्याचे कुळीं सत्रोजी महा शूर ॥ धाक जयाचा फार ॥ कांपती लोक ऐकतां थराथर ॥ पुत्र दोघे बहादूर जैतोजी बापुसाहेब त्याच परी ॥ पराक्रमी० ॥ २ ॥

---

× तालीम * घागरीचा आकार व दोन्ही बाजूंनीं उघडें असलेल्या मातीच्या भांड्याच्या एका तोंडावर चामडें लावून तयार केलेलें एक वाद्य.

त्याचे नातु दीपाजी राणे ।। बंड करोनी त्यानें सर्व जन कांपविले निज धाकानें ।। त्याचे नातु दिपाजी राणे—

इतक्यांत अंगणाच्या पलीकडे कसलासा गोंगाट झाला. म्हणतां म्हणतां तो आवाज जवळ आला. वेताळाचा संचार झाल्यासारखा आविर्भाव करीत रवळु गांवस म्हणाला,—बस्, खेळ बंद ! तालगडी बंद ! आमच्या पूर्वापार रीतीप्रमाणें जर आम्हांस शिमग्यांतील बाबी करण्याची बंदी, तर मग देवाचा ' कळस ' काढणें नको, कौल नको, प्रसाद नको, कांहीं नको. कळस आदामिनिस्त्रादोरानें* घ्यावा, ' तरंग ' रजिदोरानें+ घ्यावें, आणि ' अवसर ' देवळ्यानें काढावा !

तालगडी बंद झाली. मेरेवरची मंडळी उठली. सगळ्यांनीं रवळु गांवसाला गराडा घालून त्याजवर प्रश्नांचा भडिमार केला. सगळी मंडळी भोंवतीं जमा झालेली पाहून रवळूला अधिक चेव आला. तो म्हणतो,—हा गांव आम्ही वसविला आहे. येथें अधिकार आमचा. रानांत सत्ता वाघाची आणि गांवांत गांवकाराची ! आदमिनिस्त्रादोराची सत्ता आदमिनिस्त्रासावांत† त्याला रजिदोरानें भ्यावें. आम्हीं काय म्हणून भिणार ? गांव आमचा, देव आमचा, आणि शिमगाही आमचा. कसें गा पुतुमाम ?

पुतुमाम पुढें होऊन म्हणाला,—तें तर खरेंच. निवडुंगाचें रान कापून दगड-धोंडे फोडून काढून वसाहत केली आमच्या बापजाद्यांनीं, तो गांव कोण नेणार पाहूं या !

रवळु गांवसाचें म्हणणें काय याचा विचार कोणी केला नाहीं, आणि रवळुनेंही बराच वेळपर्यंत आपलें म्हणणें समजावून सांगितलें नाहीं. पण या दरम्यान अर्धापाऊण तास फोंडु गांवसाचें अंगण दणकेदार भाषणांनीं हलून गेलें. थोडक्याच वेळांत तेथें आणखी मंडळी जमली. किंचित् आवाज लहान होऊं लागले. आणि रवळु काय म्हणतो तें ऐकून घेऊं या, अशा स्थितीपर्यंत मंडळीचा पारा उतरत आला.

—पण गांवसा, घडलें काय ? तें तर सांगशील ?—मलू कामतीनें विचारलें.

---

* मामलेदार. + पाटील. † मामलेदाराची कचेरी.

—खलुदादी,—महादेव फळ म्हणाला,—आधीं इकडे बस बघूं. ही घे पटकूर. जरा थिरथावर हो. आणि काय झालें तें सगळ्यांना सांग.

—अरे कांहीं नाहीं. हा गांवांत देवळी मस्त झाला आहे ना! तो बामणासारखा शिकला आहे. बामणासारखा धोतर घालतो, आणि आमच्या माथ्यावर मिरीं वाटणार म्हणतो!—खलु म्हणाला.

—आपल्याला बामणच समजतो तो!—एक म्हणाला.

—पायांतली वहाण पायांतच ठेवली पाहिजे!—दुसरा म्हणाला.

—आज देवळी मस्त झाला, उद्यां महार मस्त होईल!—तिसरा म्हणाला.

—याचा बंदोबस्त झालाच पाहिजे.—चवथ्यानें सांगितलें.

कोण देवळी, केलें काय त्यानें, याचा विचार बाजूस राहून पुनः शिव्याशापांचा भडिमार सुरू झाला. याप्रमाणें अर्धा तास झाल्यावर मंडळी शांत झाली, आणि खलु गांवसाचें कथानक पुढें चालू झालें.

—शिमग्यांत पोरें शिव्यागाळी करतात, माडाचे नारळ अगर होळीचीं लांकडें चोरतात, आणि दोन दिवस आपली हौस भागवून घेतात, त्याला त्या बाबुल्याची हरकत आहे.

—काय म्हणून? हा बाबुलॉ आमचा धनी काय? हा आम्हांला कोण सांगणार?—एक म्हणाला.

—मुंबईहून ‘ इंग्रेज ’ शिकून आला आहे ना तो!—दुसरा म्हणाला.

—शिकला म्हणून? देवळ्याचा बामण झाला कीं काय? गांवांत इतके बामण आहेत, त्यांना कोणाला शिमग्यांतल्या बाबी लागत नाहींत, आणि हाच तेवढा कोण उसळणार?—तिसरा बोलला.

—अरे तो कसला उसळतो? ती त्याची विद्या उसळते! गांवांत काय इतर देवळी नाहींत! रामू, देऊ, येसू—त्यांची गांवकारासमोर बोलण्याची काय—बसण्याची देखील छाती नाहीं! पण हा बाबूलॉ बामणांच्या मेळ्यांत बसून त्यांना बुद्धि सांगतो.

—त्याला बामणाच्या मुलांनीं बरोबरीच्या नात्यानें वागविलें, त्याच्या खांद्यावर हात घालून ते फिरूं लागले, चारचौघांत त्याची सल्ला घेऊं लागले. आणि

हा आमच्या माथ्यावर बसला. आतां बामण त्याचा अभिमान धरतील !

—बामणांना अभिमान धरूं द्या, भटांना अभिमान धरूं द्या, अगर 'पाखल्यां' ना × अभिमान धरूं द्या ! बामण–भट अगर पाखले–किरिस्तांव गांवांत उत्सव करायला येणार नाहींत. उत्सव करणारे आम्ही; 'अवसर' काढणारे आम्ही; आणि सगळ्या लोकांची 'पिळगी' कौल देऊन संतुष्ट करणारे आम्ही ! पाहूं या, गांवकार मोठा कीं देवळी मोठा तें !

पुन्हां सगळ्यांचा गोंगाट सुरू झाला. जो तो मनास वाटेल तसें बोलत होता. अशा प्रकारें आणखी अर्धा तास निघून गेल्यावर एक म्हातारा रवळूचा हात धरून म्हणाला,—अरे रवळू, थांब. असा उफळतोस काय ? बाबुल्यानें काय केलें तें सावकाश सांग पाहूं. ये, असा बस या मेरेवर. बसा रे सगळे. आतां मासळीचा बाजार करूं नका ! तोंडानें फटकळपणा केला म्हणून गांवकरपण शोभत नाहीं. सगळें थंडपणानें समजून घेऊं या. आतां सांग बघूं काय म्हणतो बाबुलॉ देवळी ?

सगळे बसले, स्थिरस्थावर झालें व रवळू बोलूं लागला.—कुष्टदादी, आज मला गांवच्या 'रजिदोरा'+ नें बोलावून नेलें व ताकीद केली कीं, शिमग्यांत वाईट व घाणेरडीं 'उत्तरें' जो कोणी काढील त्याला धरून पाठवावा असा आद-मिनिस्त्रादोराचा हुकूम आहे. महाराकडून तो गांवांत ताकीद तर देणारच. पण तुमच्या सगळ्यांच्या कानावर घालण्याकरतां म्हणून त्यानें ही गोष्ट मला सांगितली. बायकांसमोर अगर पांढरपेशा लोकांसमोर कुळवाड्यांची मुलें पाहिजे तशा शिव्यागाळी देतात. त्यामुळें लोकांना त्रास होतो. हा प्रकार बंद करण्याबद्दल मोठ्या लोकांचा प्रयत्न चालू आहे. आणि शिकलेले लोक ठिकठिकाणीं हेंच सांगतात. तीच धाम * आतां गोव्यांत आली आहे. बाहेर प्लेग झाला म्हणजे इकडच्या हद्दींतले उंदीर मरूं लागतात तसलाच हा प्रकार, आणखी काय ? हें सगळें या देवळ्यानें केलें. त्यानें आद्‌मिनिस्त्रादोराचे कान फुंकले व गांवांतल्या सभ्य बायका–दादल्यांचा उपमर्द होतो हें निमित्त सांगून आमचें तोंडाचें सुख

× पोर्तुगीज. + पाटील. * सांथ

नाहींसें केलें. सगळ्या वर्षभर जी गोष्ट बोलतां येत नाहीं, ती उघडपणें व कुणाची भीडमुर्वत न धरतां आम्हांला बोलून दाखविण्याचा हाच प्रसंग. तो बंद झाला, तर आम्ही कुळवाडयांनीं मनांतला राग तरी केव्हां काढावा ?

—आं ! आतां समजलें. शिमग्यांत शिव्यागाळी देऊं नये इतकेंच ना बाबुल्याचें म्हणणें ? म्हणजे तोंडांतून अभद्र उच्चार करूं नये इतकेंच तो सांगतो. का आणखी काय आहे ?—म्हातार्‍यानें विचारलें.

—आणखी काय असणार ? आज गाळी देऊं नका म्हणतो, उद्यां पंक्तीस बसणार म्हणेल ! आणि आज ही फाजिलगिरी चालूं दिली तर कोणी नेम सांगावा, एखादे वेळीं आपल्या जातींत मुलगी द्या म्हणून सांगेल ! तें कांहीं नाहीं. ही ' बारीक जात ' ठेंचलीच पाहिजे. या खालच्या जातीच्या लोकांची अशी मुरवत धरली तर वरच्या जातीचा दरारा कसा राहील ?—खलु गांवस आवेशानें म्हणाला.

—पण हाच न्याय लागू करून बामणांनीं पानास पान मारलें तर ! तुला चालेल ? तूं कनिष्टाला चेंचणार आणि वरिष्ठानें तुझ्या माथ्यावर काठी हाणली तर ?—म्हातार्‍यानें विचारलें.

क्षणभर स्तब्धता पसरली. एकमेकाच्या तोंडाकडे टकमक पाहण्यांत पांच दहा मिनिटें गेलीं.

—मग तूं तरी काय सांगतोस ? देवळ्याचे बूट खांद्यावर घेऊं या ?—खलूनें उद्विग्न होऊन विचारलें.

—अरे, तसें नव्हे. उगीच संतापून रक्त कां कढवितोस ! बाबुलॉ हा जातीनें देवळी आहे, हें खरें. पण देवाचीं लेकरें या नात्यानें आम्हीं सर्व एकाच जातीचे आहोंत. शिवाय एकाच गांवचे रहिवाशी, हें कलम लावलें तर आमच्यांत भेद तो काय ? शिवाय तो उर्मटपणानें वागतो काय ? तुमच्या गांवपणांत तो बोलतो काय ? सभामंडपांत तो तुमच्या मांडीस मांडी लावून बसणार म्हणतो काय ? तो काय म्हणतो ? अभद्र बोलूं नका; सभ्यतेनें वागा; निर्मळपणा राखा; देवाचें स्थान पवित्र ठेवा; गांवचा दर्जा वाढवा; हेंच म्हणतो ना तो ? तो काय आपणास पंक्तीस घ्या म्हणतो ? उलट तो गांवांत आल्यापासून देवळांतली घाण नाहींशी

झाले. गुरव नीट पूजा करूं लागला. तुम्हीं सगळ्यांनीं देवळांत बीं-बियाणें ठेवल्यामुळें उंदरांचा त्रास होत होता, तो गेला. सभामंडपांत लांकडांचा ढीग पडला होता, तो गेला. देवळांतल्या नंदीवर भावणीच्या हातचे शेणसडे पडून त्याला सूज आल्यासारखी दिसत होती, ती गेली. बावुलॉ मुंबईहून आल्यापासून सगळी घाण त्यानें स्वतः उपसली, नंदीला शेणाच्या कवचांतून मोकळा केला, सगळ्या देवळांत रंग काढून आपल्या खर्चानें त्यांत दुरुस्ती केली, लहान मुलांना एकत्र करून रोज भजन सुरू केलें, आणि आतां शाळा घालून या गांवांत रहाण्याचा त्याचा मानस आहे. त्यानें शाळा घातली तर आमच्या मुलांना चार अक्षरें लागतील. पोरांना रीतभात लागेल. तुम्ही त्याला बामणा-सारखा म्हणून नांवें ठेवतां, पण तो बामणासारखा शिकला म्हणूनच त्याला हे विचार आले ना ? तो मुंबईस गेला, कष्ट करून शिकला, आणि आतां गांवची सुधारणा करण्याचा प्रयत्न करतो. त्याच्या बरोबरचे त्याच्या जातीचे आणखी देवळी नाहींत ? पण हा शिकलेला देवळी. याची पायरी वर गेली.

—म्हणूनच तो आमच्या माथ्यावर बसूं पहातो ना ?—खळू गांवस संतापून म्हणाला.

इतक्यांत मागाहून आवाज झाला,—खळूदादी, उगाच संतापून जिवाला त्रास करून कां घेतोस ! देवळी माथ्यावर बसूं पहातो ही भाषा कारणाशिवाय कां ? माझ्या तोंडातून एखादा शब्द तुमचा अपमान व्हावा असा निघतो काय ? मी काय म्हणतों तें तरी नीटपणें ऐकून घ्या ! तुम्हीं गांवचे धनी, तुम्ही गांवकऱ्यांनींच आडमार्ग धरला तर इतर पिगळी त्याच मार्गानें जाईल. एवढा मोठा आमचा गांव ! एवढी ग्रामसंस्था असतां, आणि आमच्या गांवांत इतकें लोकबळ असतां, या तालुक्यांत आम्हांला त्याप्रमाणें मान आहे का ? तो कां नाहीं ? तर कुळवाड्यांचा गांव, आशिक्षितांचा गांव, बंडखोरांचा गांव, अशी प्रसिद्धी आहे म्हणूनच ना ? तुम्ही सरकारी कचेरींत, दिवाणींत, अगर बाजारांत जा, तुम्हांला कसें वागविण्यांत येतें ? तुम्हांला मन आहे, बऱ्या वाईट समजुती आहेत, मान अपमान कळतो, सुखदुःखाच्या भावना आहेत, हें पांढरपेशा लोकांच्या ध्यानांत आहे काय ? तें कां नाहीं ? तर तुम्हीं ती जाणीव त्यांना करून

दिली नाहीं म्हणून !

—कां बरें ? आम्हांस इतर लोक फटिंग समजतात कीं काय ? आम्ही बाजारांत गेलों तर पाहिजे तो जिन्नस खरेदी करतों.—एक म्हणाला,

—जिन्नस खरेदी करणें अगर उचापती × नें आणणें यांत काय महत्व? पण चारचौघांत तुमच्या शद्वाला किंमत आहे काय ? तुमच्या गांवचें महत्व या तालुक्यांत काय आहे ? याचें कारण तुमची हडेलहप्पी वृत्ति ! घाव मारावा हें तुम्हांला माहित, पण तो कुठें, केव्हां याचा विचार कोण करतो ? मागें गुराख्यांच्या तंट्यावरून आदमिनिस्त्रासावांत मोठमोठ्या गांवकारांना नेऊन गुरांसारखें बडवून काढलें, त्यावेळीं तुमचा त्राता कोण पुढें आला ? बंडवाल्यांना सामील असल्याचा आरोप ठेवून कांहींच चौकशी न करतां तुमच्या बापभावांना तारवावर चढविलें तेव्हां तुमच्या मदतीस कोण धांवून आला ? तुमच्यांत एकी नाहीं, सांगितलेलें कळत नाहीं, तंटाबखेडा करण्यांतच तुम्हांला पुरुषार्थ वाटतो, आणि माझ्यासारख्यानें दोन शब्द सांगितले तर तो देवळ्याचा शब्द म्हणून तुम्हांस संताप येतो !

बाबुलॉ देवळी शांतपणें आपलें म्हणणें समजावून देत होता. सगळ्यांचा राग हळूहळू निवत चालला होता. दुसऱ्याचा राग वाढेल असा शब्द अगर आवाज न काढल्यामुळें बहुतेक गांवस–गांवकर त्याचें म्हणणें ऐकून घेत होते. इतक्यांत मागील म्हाताऱ्यानें विचारलें,

—बाबुल्या, थंडपणानें सगळें सांग पाहूं. आदमिनिस्त्रावांत 'केस' कोणीं केली ?

—मी केस दिली. खरं सांगायचं म्हणजे लेखी अर्ज दिला नाहीं. फक्त या लोकांस ताकीद मिळावी म्हणून ही भाषा केली. आज आठ दिवस मी काकुळतीस येऊन, हात जोडून, पायां पडून सांगतों कीं, तुमचीं मुलें शिव्यागाळी करतात, लोकांची नांवें घेऊन हलकटपणाचे शब्द वापरतात, बायकांची देखील मुरवत धरीत नाहींत, त्याला बंदी करा. तें तर नाहींच, पण उलट त्यांना उत्तेजन देऊन रात–बेरात लोकांच्या अंगणांत येऊन बोंबा ठोकणें, घरावर दगड फेंकणें व

---

× उधारीनें.

कानांत बोटें घालण्यासारखे अभद्र शब्द उच्चारणें, असला प्रकार कित्येकांनीं सुरू केला. मला राग कां येऊं नये ? आमच्या भावणींच्या वाड्यावरच ही दंगल अधिक ! आम्ही माणसें नाहींत अशी तुमची समजूत आहे काय ? मी तुमचा काय अपराध केला आहे तो तरी माझ्या पदरांत घाला ! मी तुमचें वाटेल तें काम करतों. त्यांत मला अपमान नाहीं, पण तुम्ही शहाणेसुर्ते, उच्चकुलीन मराठे, आपल्याला शिवाजी महाराजांच्या जातीचे म्हणवून घेतां आणि हा मल्हाररावाच्या जातीलाही न शोभणारा प्रकार कां करतां ?

—पण शिमग्याच्या दिवसांत काय आजच आमचीं पोरें शिव्यागाळी करतात ? ती आमची परंपराच ! आमच्या आजापणजांनीं लहानपणीं दिल्या, आम्ही त्यांचीच री ओढली, आणि आमचीं मुलेंही तेंच करतात ! आमच्या जातीचें तें कामच आहे !—त्या घोळक्यांतून एकाचा आवाज आला.

—आजापणजांची री तुम्ही ओढणार ? आतां तुम्हांला बोललें तर वाईट वाटेल. पण बोलतोंच ! ऐक यांचें हें फटीदादी हं. तुमचे आजेपणजे लंगोटी घालून गांवांत फिरत होते; तुम्हांला बामणांसारखीं धोतरें कां पाहिजेत ? ते कांबळ घेत होते; तुम्ही शास्त्र्यांप्रमाणें शाली कां पांघरतां ? ते डोक्यास चिंधी गुंडाळीत होते; तुम्ही भटांसारखे रुमाल कां बांधतां ? ते मडक्या-गाडग्यांतून संसार करीत होते; तुम्हांला लखलखीत तांब्यापितळेचीं भांडीं कशाला पाहिजेत ? आणि इतर बाबतींत त्यांचें अनुकरण नको ? देवाच्या कृपेनें तुमच्या खोंपट्या हळूहळू नाहींशा झाल्या, त्या जागीं कौलाचीं घरें आलीं, पण त्यांत पूर्वीसारखे भातानें भरलेले ‘ कडे ’ दिसत नाहींत ! शेताचे ‘ भागेली ’ अर्थात् भागीदार म्हणून तुम्हांला जो मान मिळत होता तो आतां शहरांतून हमालाचें काम करतांना मिळेल काय ? पोषाख कोण करीत नाहीं ? आणि बुगड्या, गळसऱ्या, कोणाच्या बाया घालीत नाहींत ? नांवानें गांवकार पण कर्मानें हमाल अशी तुमची दशा झाली आहे. याचा तुम्ही विचार केला काय ? सत्य हें सत्यच; मग तें बामणानें सांगितलें काय, मराठ्यानें सांगितलें काय, किंवा देवळ्यानें सांगितलें काय, त्यांत फरक पडत नाहीं !

—होय हें तर खरेंच. न्याय हा देवळ्यानें सांगितला काय, किंवा महारानें

सांगितला काय, न्याय तो न्यायच ! मला तुझें बोलणें रास्त वाटतें—फटी गांवस म्हणाला.

—पण कदम काळापासून चालत आलेली रीत ही मोडणार कशी तूं ? हा अधिकार तुला कोणी दिला ? दिवटी धरण्याचा तुझा अधिकार ! गांवांतले इतर देवळी गप आहेत. त्यांना तुझ्यासारखीच बुद्धि नाहीं काय ?—रवळूनें प्रश्न केला.

—समजलों, गांवकारा, तुझ्या प्रश्नाचा अर्थ ! ते माझ्या जातीचेच लोक आहेत, पण अशिक्षित असल्यामुळें चालू रूढींतील बऱ्यावाईटाचा फरक त्यांना कळत नाहीं. मला शिक्षणामुळें तो कळतो, म्हणून तर जीव तोडून मी सांगतों. मला बुद्धि होती म्हणून तर शिक्षणाची आवड, सदसद्विवेकविचार, व सुधारणांची इच्छा हीं माझ्यांत उत्पन्न झालीं ! दिवटी घेऊन उभें रहाण्याचाच माझा अधिकार आहे....समजलें रवळूदादी ! मी दिवटी घेऊन उभा राहतों, म्हणून मला प्रकाश व अंधार यांतील फरक कळतो. इतर लोकांना अंधारांतून वाट दाखविण्याचें काम मजकडे आलें, ही देवाची कृपा होय असें मी समजतों. दिवटी घेऊन आजही तुमचा मागोवा करण्याची माझी तयारी आहे. तुमच्या मुलांनीं शिकावें, डोळे उघडून नव्या जगाकडे पहावें, अंधारांत अडखळत राहूं नये, उजेडांत पाऊल घालून मार्ग चोखाळावा याचकरतां माझा जीव खालींवर येतो ! कुळवाड्यांना मन आहे, भावना आहेत, त्यांना आवडीनिवडी आहेत, त्यांना वर येण्याची इच्छा आहे, चांगल्या संस्कारांची त्यांना महति समजते हें तुम्ही जगाला पटवून दिलें पाहिजे इतकेंच मी म्हणतों.

—याबद्दल तूं तरी काय योजलें आहेस ?—दम निघून गेल्यावर रवळूनें प्रश्न केला.

—बाबुल्या, तुझें म्हणणें त्यांना नीट समजावून दे पाहूं. ये, असा बस इकडे. आणि तुझी बांधावळ* सांग.—फटी गांवसानें त्याचा हात धरून त्याला म्हटलें.

—नको. तुम्हां गांवधन्यासमोर बसलें म्हणजे पुरुषार्थ आहे असें समजणारा

---

* योजना.

मी नव्हे. उभा राहून माझे पाय शिणत नाहींत. मी मुंबईत असतांना आमच्या गांवच्या सुधारणेविषयीं अनेक कल्पना मला येत. एवढा मोठा गांव, पण धड एक शाळा नाहीं, देवळाची सुस्थिति नाहीं, शेताभाताची निगा नाहीं, स्वच्छतेची आवड नाहीं, आणि एकोपा तर नाहींच नाहीं! पूर्वीचे लोक भोळे, देवभितरे व काम–कष्टी असत. ते सांजसकाळ वावर× करून अनेक धान्यें पिकवीत, धन्याचा खंड सुरळीत देऊन आपल्या घरांतलीं पोरेंबाळें धादोस ÷ ठेवीत. त्यांच्या शब्दावर जमीनदारांचा विश्वास होता. तेव्हांचा कुळवाडी जमिनीचा भागेली होता, आज त्याची वृत्ति बदलली आहे. तो फटिंगपणा करून स्वतःचेंही नुकसान करून घेतो. यामुळें त्याला कर्जांत, गुलामगिरींत अथवा दारिद्र्यांत सर्व आयुष्य घालवावें लागतें. याचा कांहीं तरी विचार व्हावा, या अधोगतींतून तुमची सुटका व्हावी, घामाकष्टाची पेज–आमील तुम्हांला सुखानें खातां यावी, हाच माझा उद्देश आहे. साधला तर प्रयत्न करावयाचा, न पेक्षां देवास साष्टांग नमस्कार करून पुनः मुंबई गांठायची! —-बाबुल्याचा गळा भरून आला.

——म्हणजे शाळा घालणार तूं! आमच्या मुलांना शिकवणार आणि आम्हांला चांगल्या रीतीभाती लावणार हेंच म्हणतोस ना तूं? मग रे रवळू, तुझें कसलें आडमेळें * त्याला या ब-या कामास? आमचीं पोरें शहाणींसुर्तीं झालीं तर काय वाईट झालें होय?——एका गांवकारानें म्हटलें.

——बाबुल्याचा न्याय बरोबर आहे. तो खरा विद्वान आहे. तो काय आडन्याय बोलणार?——दुसरा म्हणाला.

——हिंदुधर्माच्या दुर्दैवामुळें उत्पन्न झालेल्या जातींत माझा जन्म झाला हें खरें, पण जातिधर्माप्रमाणें पातिव्रत्यानें वागून माझ्या आईनें आपल्या पुण्यप्रद चरित्राचा कित्ता मजसमोर ठेवला आहे. माझ्या पूज्य वडिलांनीं जन्माबरोबर जे महत्वाचे संस्कार मला दिले, त्या उपकाराची फेड म्हणून तर मी ब्राह्मणाचें पवित्र कर्तव्य जें विद्यादान तें करण्यांत आयुष्य खर्चेण्याचा संकल्प केला आहे. माझें सारें आयुष्य, सर्व कर्तबगारी व कमावलेली विद्या या गांवाप्रीत्यर्थ मी खर्च करणार!

---

× काम. ÷ सुखी, समाधानी. * अडचण, विरोध.

यांत मला तुम्ही सर्वांनीं मदत केली पाहिजे. मी देवळी आहें, मी तुमचाच—नव्हे तर सर्व समाजाचा दासानुदास आहें. देवाची व देशाची सेवा करण्याकरतांच माझा जन्म आहे असें मी समजतों. देवळी याचाच अर्थ देवाचा चाकर. देवळांत बसलेल्या मूर्तीतच तेवढा देव आहे, असें मी समजत नाहीं. त्या देवाचें रूप मी सर्वत्र पाहतों. या फटीदादींत, या रवळूदादींत तेंच मला दिसतें, आणि तुमची सर्वांची सेवा तीच देवाची सेवा अशी माझी दृढ भावना आहे. एक वर्ष मला मदत करा, मी सांगतों त्याप्रमाणें वागा, व तुमची स्थिति बदलते कीं नाहीं तो अनुभव घ्या ! हा भगवान् सूर्यनारायण आपलें मस्तक वर करून हांसत हांसत आमचें भाषण ऐकतो आहे ! आपल्या ‘ दिवटीवाल्या ’ च्या अभिमानानें साक्षीदाराचें काम करण्याकरितां तो तेजोनिधि प्रगट झाला आहे ! त्याच्यासमोर उभे राहून त्याला वंदन करूं या. या जगच्चालकाचा दिसणारा हा प्रतिनिधि आमच्या संकल्पास यश देवो ! फटीदादी, तूं आमच्यांत वडील माणूस. बेंबीच्या देंठापासून गाऱ्हाणें घाल पाहूं !——

फटीदादीनें गाहिंवरून व कोंपरापासून हात जोडून गाऱ्हाणे घातलें. सर्वांनीं देवाच्या नांवानें जयजयकार केला व प्रफुल्लित चेहऱ्यानें बाबुल्याकडे सगळे पाहूं लागले.

रवळू गांवसानें बाबुल्यास कडकडून मिठी मारली व म्हटलें,——बाबुल्या धन्य तूं ! तुझें रगत खरेंच उंच ! शिमग्याच्या महिन्यांतील खूण म्हणून माझ्या गळ्यांतली ही मोगऱ्याची माळ काढून मी तुझ्या गळ्यांत घालतों. आतां तूं आमचा झालास !

बाबुलॉ डोळे ओले करून म्हणतो,——रवळूदादी, तुझ्या तोंडानें गांवचा रवळनाथच हें बोलतो असें मी समजतों. तुमची समजूत लवकर पटली ही त्याचीच कृपा. कुळवाडी झगडले तर लवकरच एक होतात, ब्राह्मणांसारखा दीर्घद्वेष धरण्याचें त्यांना साधत नाहीं हेंच तत्त्व खरें ठरलें म्हणायचें !

# परिवर्तन.

श्री. व्यंकटेश ना. नाइक, बी. ए.

व्हायोलिन वाजविण्यांत पॅट्रिक अगदीं तल्लीन झाला होता. खिडकीजवळ मेजावर बसून डाव्या खांद्यावर टेकलेल्या व्हायोलिनच्या 'चिन' वर आपली हनुवटी टेकून, त्या आवडत्या स्वर्गीय कलेची एकनिष्ठतेनें उपासना करण्यांत पॅट्रिकचे तासचे तास कधींच निघून जात. त्यानें व्हायोलिन–वादनांत कौतुकावह नैपुण्य संपादिलें होतें. त्याचा बाप उत्तम व्हायोलिनिस्ट व संगीतज्ञ असल्यामुळें पॅट्रिकच्या अंगीं ती कला आनुवंशिकतेनें येणें स्वाभाविक असलें, तरी त्यानें व्हायोलिनवर गेलीं आठ–नऊ वर्षें घेतलेली मेहनतहि दृष्टीआड करण्यासारखी नव्हती.

पॅट्रिक पेडण्याहून गेल्या महिन्यांत पहिल्यानेंच मुंबईला आला होता. त्याचा बाप तेथील इग्जेंत 'चर्चमास्टर' होता. पॅट्रिकनें लहानपणींच त्याच्याजवळ व्हायोलिन शिकायला सुरवात केली. पेडण्याला शेजारीं रहाणाऱ्या एका हिंदु गायिकेच्या आग्रहानें व शिकवणीनें त्यानें हिंदी पद्धतीचें संगीतहि बरेंचसें हस्तगत केलें होतें. पण या कलेच्या ठिकाणीं इतकी आसक्ती असणाऱ्या पॅट्रिकची शालेय रुक्ष बौद्धिक शिक्षणांत विशेष प्रगति झाली नसल्यास त्यांत नवल नाहीं. मॅट्रिकच्या दोन–तीन वाऱ्या केल्यावर 'हा मार्ग आपला नाहीं' असा विचार करून त्यानें तो सोडून दिला होता. परंतु घरची स्थिति गरिबीची असल्यामुळें रोजगार पहाण्यासाठीं तो मुंबईला आला होता. पेडण्यासारख्या नितांतरमणीय ठिकाणीं निर्झरांच्या मंजुळ संगीताला साथ करणाऱ्या, पांखरांशीं बागडणाऱ्या, व झाडांबरोबर डुलणाऱ्या काव्यमय अंतःकरणाच्या पॅट्रिकचें मन मुंबईच्या गोंगाटांत व धकाधकीच्या नीरस आयुष्यांत रमणें शक्यच नव्हतें. तेथें त्याच्या मनाला विसांवा

देणारी कोणती गोष्ट असेल तर त्याचें आवडतें व्हायोलिन.

अकल्पितपणें पॅट्रिकच्या समाधीचा भंग झाला. पॅट्रिकनें चमकून मागें पाहिलें. समोरच्या खिडकींत रोज उभी राहून पॅट्रिकच्या संगीताचा आस्वाद घेणारी सतरा अठरा वर्षांची एक पारशी मुलगी आज आपल्याकडे आलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें व तो गोंधळून गेला. त्याला काय बोलावें हें सुचेना. गोमंतकीय ख्रिस्ती समाजांत स्त्रीपुरुषांची एकमेकांशीं वागणूक मोकळेपणाची असली, तरी पॅट्रिक जात्याच भिडस्त असल्यामुळें मार्गारेटाशिवाय इतर कोणा तरुण मुलींशीं बोलण्या-चालण्याचे प्रसंग विशेष आलेलेच नव्हते. तथापि त्याचा शिष्टाचार जागृत होऊन मूकवृत्तीनेंच पण किंचित् अदबीनें त्यानें खुर्ची पुढें केली.

—क्षमा करा हं आपल्या संगीतांत व्यत्यय आणल्याबद्दल !—ती मुलगी सफाईदार इंग्रजींत, मृदु आवाजानें म्हणाली.—आपल्या संगीताच्या आकर्षणामुळंच माझ्याकडून असा धृष्टपणा झाला.

—अंहं ! आपलं आगमन ही मी माझ्यावर आपली कृपाच समजतों. आमचं खेडवळांचं कसलं आलंय संगीत ! तुम्हांला तें आवडलं यांतच त्याचं चीज झालं.

त्या मुलीचे आपल्याकडे रोखलेले पाणीदार डोळे पाहून पॅट्रिक गोंधळून गेला; आणि आपल्या मनाची गोंधळलेली स्थिति तिच्या लक्षांत आली हें पाहून तो किंचित ओशाळाहि झाला. पण पिरोजा–ती तरुण मुलगी–सहास्य मुद्रेनें म्हणाली,—खेडवळ आहे म्हणूनच त्यांत जिवंतपणा आहे, आकर्षकता आहे ! आमचं शहरी संगीत गिरण्यांच्या गोंगाटांत नी गडबडाटांत गुदमरून गेलेलं असतं ! खरं संगीत तुमच्या गोव्याच्याच लोकांत आढळतं. खरंच, किती सुंदर वाजवतां तुम्ही ! आमच्या ‘ पपां ’ नीं तर काल तुमची फारच स्तुति केली.

पॅट्रिक किंचित लाजला. पण त्या मुलीच्या मनाचा मोकळेपणा पाहून त्याला बराच धीर आला. क्षणमात्र थांबून तो म्हणाला,

—तुम्हांलाही गातां वाजवतां येत असेल ?

—तसं म्हणण्यासारखं विशेष नाहीं. पण आपली कृपा झाली तर...!

—म्हणजे ?—पॅट्रिक मध्येंच उद्‍गारला.—याचा अर्थ नाहीं लक्षांत आला !

—याचा अर्थ असा कीं, मला आपणापाशीं संगीताचे पाठ घ्यायचे आहेत. पपा म्हणाले कीं लायक माणूस जवळ असतांना दूर कशाला जायचं ?

पॅट्रिकच्या अंतःकरणाला अभिमानाची एक नाजुक छटा स्पर्शून गेली. आजपर्यंत मार्गारेटकडून उघडया स्तुतिसुमनांचे हार अनेकदां त्याच्या कंठांत पडले होते. पण आज सर्वस्वी परकी अशा त्या तरुणीनें त्याची मोजक्याच शब्दांत योग्य स्तुति केली होती.

तिच्या आग्रहावरून त्यानें एक पोर्तुगीज गीत व्हायोलिनवर वाजवून दाखविलें. त्याच्याकडून दुसऱ्या दिवशीं आपल्या 'पपा'च्या भेटीला येण्याचें वचन घेऊन पिरोजा थोडया वेळानें निघून गेली.

व्हायोलिन तसेंच मेजावर 'आ' वासून उघडें पडलें. आपल्या कॉटवर पडून नुकत्याच घडून आलेल्या अकल्पित गोष्टीचा विचार करण्यांत पॅट्रिक गुंग झाला. अनेक परस्परविरोधी विचारांनीं त्याच्या मनांत खळबळ उडविली. पण त्यांतहि मार्गारेट आणि पिरोजा यांच्याबद्दलचे विचारच प्रमुख होते.

मार्गारेट ही पॅट्रिकची मामेबहीण. शिक्षणाकरतां बरींच वर्षें पॅट्रिक शिवोलीला आपल्या मामाकडे होता. आपल्या देखण्या, सरळ मनाच्या व धार्मिक वृत्तीच्या भाच्यालाच आपली एकुलती एक मार्गारेट द्यावी, असा पॅट्रिकच्या मामाचा विचार होता. पॅट्रिक मार्गारेटवर अनुरक्त होता. तिच्या सहवासांत घालविलेल्या दिवसांच्या गोड आठवणींनीं क्षणमात्र त्याला सध्यांच्या स्थितीचा विसर पाडला. त्याच्या मनश्चक्षूंसमोर त्या दिवसांचीं मधुर दृश्यें उभीं राहिलीं.

पेडण्याला असतां कधीं सरमाळयाच्या झरीवर, तर कधीं मालप्याच्या सुंदर पोफळीच्या बागांत, तर कधीं डोंगरउतरणीवरील भरडांत, मार्गारेटच्या बरोबर त्यानें व्हायोलिनवर आलाप घेतले होते. त्या आलापांचे प्रतिध्वनी आतां त्याच्या अंतःकरणांत घुमूं लागले. शिवोलीला चांदण्या रात्रीं रुप्याप्रमाणें चकाकणाऱ्या खाडीवर, होडींतून मार्गारेटला हृदयाशीं घेऊन त्यानें अनेकदां विहार केला होता. संसारसमुद्रांतूनही मार्गारेटला घेऊनच त्याला आपली जीवित–नौका हांकारायची होती. कधीं बांधावर, शेजारीं टोपली घेऊन असलेल्या मार्गारेटशीं गुलगुल

गोष्टी बोलत त्यानें ‘ फिशिंग ’ केलें होतें; कधीं डोंगरावर पाखराप्रमाणें स्वच्छंदानें फिरत काजू, करवंदें, चुरणें वगैरे वन्य फळांचा त्यानें मार्गारेटबरोबर आस्वाद घेतला होता. पॅट्रिकच्या डोळ्यांसमोर हीं मधुर दृश्यें एकामागून एक येऊन गेलीं. पण कां नकळे, त्यांच्यामागें त्याला पिरोजाचीच अस्पष्ट आकृति दिसूं लागली. त्याच्या मनानें त्याच्या नकळतच पिरोजा व मार्गारेट यांची तुलनाहि करायला सुरवात केली.

मार्गारेट कांहीं झालें तरी एक साधी खेडवळ पोर होती. अंगांतून निरोगी, मुग्ध यौवनसौंदर्य मुसमुसत असलें, तरी त्यांत साधेपणाच होता. पिरोजासारखें दिपवून टाकणारें असें तें नव्हतें. मार्गारेटचें सौंदर्य कपेलांतल्या+ खुर्सांपाशीं* लावलेल्या मेणबत्तीच्या प्रकाशासारखें होतें, तर पिरोजाचें बिजलीच्या बत्तीसारखें डोळ्यांना दिपविणारें होतें. ती काळी नव्हती, पण पिरोजाप्रमाणें ती केतकीशीं स्पर्धा करणारीहि नव्हती. पिरोजाच्या बोलण्याचालण्यांत एक प्रकारची ‘ ग्रेस ’ होती. मार्गारेट कामों-इशच्या† लुझीयदशx चीं पारायणें करण्यांत तल्लीन होत असली तरी पिरोजाप्रमाणें सफाईदार इंग्रजीहि तिला येत नव्हतें ! उघड्या अंतःकरणानें खळखळां हंसणाऱ्या मार्गारेटला पिरोजाप्रमाणें नाजुक मंदस्मित करणें ठाऊकच नव्हतें ! पिरोजाच्या गालांवरील गुलाबी लाली पोंवळ्यांच्या करंडकांत ठेवलेल्या मौक्तिकमालेसारखी भासणारी तिची शुभ्र दंतपंक्ति, आणि तिच्या त्या पाणीदार डोळ्यांतील चांचल्ययुक्त भेदकता यांचा पॅट्रिकला विसर पडणें शक्यच नव्हतें.



मिस्तर आरदेशिर रुस्तुमजी वर्किंगबॉक्सवाला—पिरोजाचे ‘ पपा ’—यांच्या विनंतीवरून पॅट्रिक पिरोजाला संगीत शिकवायला जाऊं लागला. भरपूर वेतन व पिरोजाची तीव्र आकलनशक्ति यांमुळें खूष होऊन तो तिला मनःपूर्वक शिकवूं लागला. त्याचें अंतःकरण तिच्याकडे अधिकाधिक आकृष्ट होऊं लागलें. मात्र

---

+ छोटेसें ख्रिस्ती प्रार्थना मंदिर. * क्रॉस. † सोळाव्या शतकांत होऊन गेलेला सुप्रसिद्ध पोर्तुगीज महाकवि. x कामोंइशनें वास्को डी गामाच्या हिंदुस्थानापर्यंतच्या पहिल्या सफरीवर लिहिलेलें महाकाव्य.

आपण कुठेंतरी चुकत आहों अशी टोंचणी त्याच्या मनाला लागली.



दोनतीन महिने कधींच निघून गेले. पॅट्रिकला हळुहळू मार्गारेटचा विसर पडत चालला. त्याच्याकडून तिच्या पत्रांना उत्तरें वेळेवर जाईनात. बिचारीला सुवासिक गुलाबी नोटपेपरवर सफाईदार भाषेंत प्रेमपत्रिका लिहितां येत नसल्या, तरी तिच्या साध्या शब्दांतून तिचें पॅट्रिकवरील उत्कट प्रेम व्यक्त होई. परंतु पॅट्रिकच्या डोळ्यांवर पटल आलें असल्यानें त्याला तें दिसणें शक्य नव्हतें. पिरोजाच्या झगझगीत प्रकाशांत मार्गारेटच्या मिणमिण प्रकाशाला स्वतंत्र अस्तित्व कसें असेल? आतांशा पॅट्रिक पिरोजच्या सहवासांत स्वर्गसौख्य मानीत होता. तिची प्रत्येक क्रिया त्याला कमनीय वाटूं लागली. तिचें आपणावर उत्कट प्रेम आहे असा त्याला भास होई. त्याचा स्वभाव किंचित उतावळा असला तरी आपणाला तिच्याविषयीं वाटत असलेल्या प्रेमाची त्यानें अजून परिस्फुटता केली नव्हती.

नाताळचे दिवस आले. दरसाल तो नाताळचे दिवस अत्यंत आल्हादानें घालवीत असे. पण यंदा मार्गारेट नव्हती, तर पिरोजा होती. पिरोजानें त्याला पुष्कळ वस्तु नजर केल्या. तिचे ' पपा 'ही पॅट्रिकवर खूष होते. पॅट्रिकला आतां शंका उरली नाहीं. पिरोजा आपल्याशीं विवाह करील का? न करायला काय झालें? तिच्यासारखी सुशिक्षित मुलगी धर्माला कवटाळून खास बसणार नाहीं. शिवाय परवां पारशी लोकांनीं परधर्मियांशीं विवाह करूं नये म्हणून सभा भरली होती, तेव्हां ती तिच्याविषयीं प्रतिकूल बोलली होती.... कांहीं झालें तरी आतां आपली हृदयमंजुषा तिच्यापाशीं खोलायचीच असा पॅट्रिकनें निश्चय केला.



—काय मूर्ख आहे तरी!—पॅट्रिक कॉटवर पडल्या पडल्याच मार्गारेटचें पत्र वाचीत असतां तिरस्कारानें उद्‌गारला,—म्हणे यंदा चुकलंसं वाटतं! अन् दर आठवड्याला पत्र लिहिण्याखेरीज आम्हांला दुसरा उद्योगच नाही असं वाटतं कीं काय या पोरीला! माझ्यासाठीं पुष्कळ वस्तू तयार केल्या आहेत म्हणे! काय, उशीचीं कव्हरें कीं जाळीचे हातरुमाल? छे! या पोरीला आतां स्पष्टच कळवायला

पाहिजे, कीं तुझा माझा कांहीं संबंध नाहीं म्हणून ! आणि तिच्याबरोबर दोती× शिवाय मुलीमोकळा होंऊं पहाणाऱ्या तिच्या बापालाही बसूं दे शंख करीत.

त्या पत्राचा चोळामोळा होऊन तें कोंपऱ्यांत पडलें. पॅट्रिक झटकन उठला, व पॅडमधील एक कागद टरकावून लिहायला बसला. परंतु पत्राप्रमाणें इतक्या वर्षांच्या प्रेमाच्या आठवणींचा चोळामोळा थोडाच करतां येतो ? पॅट्रिकला आपल्या हीनतेची शरम वाटली. त्याची लेखणी पुढें चालेचना. खिन्न होऊन पॅट्रिक किंचित्काळ स्तब्ध बसला. इतक्यांत मिनू–पिरोजाचा बॉय–एक चिठी घेऊन आला.

मार्गारेटविषयींच्या विचारांचें गांठोडें बांधून पॅट्रिकनें फेंकून दिलें. उत्फुल्ल मनानें तो चिठी वाचूं लागला.

प्रिय मि. डिसिल्वा,

आपल्यापाशीं आजवर गुप्त ठेविलेल्या एका गोष्टीची परिस्फुटता करायची आहे, पण ती पत्रांतून नाहीं. आपल्या आगमनाचा लाभ द्याल तेव्हां.

पिरोजा

आपल्या आनंदावर पॅट्रिकला नियंत्रण घालतां येईना. आपल्याशीं करायची परिस्फुटता दुसऱ्या कशाची असणार ? मि. वर्किंगबॉक्सवाल्यांनीं आपल्या विवाहाला संमति दिली कीं काय ? क्षणमात्र पॅट्रिकला मार्गारेट, तिची आई, आपले आईबाप, वगैरेंची आठवण झाली. पण या वेळीं त्यांचा विचार करून चालू आनंदावर विरजण टाकणारा पॅट्रिक नव्हता. तो झटकन उठला, व नीटनेटका पोषाख करून दोन तीन मिनिटांत पिरोजच्या बंगल्याच्या कंपौंडांत पोंचला.

उल्हसित मनानें जिना चढून त्यानें 'बेल'चें बटन दाबलें. क्षणार्धांत पिरोजनें येऊन दार उघडलें. पॅट्रिकच्या मनाला एक असूयायुक्त सूक्ष्म धक्का बसला. पिरोजा एकटी नव्हती. ऐटबाज, अप–टु–डेट असा गौरवर्णाचा व सुदृढ बांध्याचा एक पारशी युवक तिच्या मागें होता.

पिरोजा अगदीं आनंदांत होती. तिनें सहास्य मुद्रेनें पॅट्रिकला अभिवादन केलें, व ती त्याला घेऊन दिवाणखान्यांत गेली. पॅट्रिकला आज त्या अपरिचित तरुणाच्या

---

× दोति (dote)=वरदक्षणा, हुंडा.

आगमनानें चमत्कारिक वाटत होतें. त्यानें टेबलावरील एका मासिकाचा अंक काढून त्यांत डोकें खुपसलें.

—मि. पॅट्रिक डिसिल्वा.—पिरोजा त्या तरुणाला पॅट्रिकची ओळख करून देऊं लागली.—यांच्याविषयीं माझ्या पत्रावरून तुम्हांला माहिती झालीच आहे. मि. डिसिल्वा, हे मि. जहांगीर श्रॉफ, माझे Fiancé. यंदाच हे बी. ई. ला बसणार आहेत.

पॅट्रिकनें त्याला अभिवादन केलें. पण त्याच्या चेहऱ्यावर काळी छाया पसरली. तो शून्य दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागला. लज्जा, खेद, अनुताप अशा निरनिराळ्या विकारांनीं त्याच्या मनांत कल्लोळ उठवला. कानशिलांतून कळा निघत आहेत असें त्याला वाटूं लागलें. मि. श्रॉफनें विचारलेल्या प्रश्नांचीं आपण काय उत्तरें देत आहों याचेंही त्याला भान राहिलें नाहीं.

—मि. डिसिल्वा, आज तुम्हांला बरं वाटत नाहीं ? तुमची मुद्रा अगदीं गळून गेलेली दिसतेय ! थोडा चहा घेतला म्हणजे बरं वाटेल.—पिरोजाच्या बोलण्यांत कळकळ भरली होती. तिनें मिनूला हांक मारून चहा व फराळाचें सामान आणविलें. पॅट्रिक अगदीं शून्य झाला होता. त्यानें यांत्रिकतेनें केक खाल्ला व चहाहि पिऊन टाकला. पण त्या दोघांच्या हास्यविनोदाकडे त्याचें लक्षच नव्हतें. अखेर त्याला तिथें बसणें अशक्य झालें. तो ताडकन् खुर्चीवरून उठला.

—मि. श्रॉफ, मिस् वर्किंगबॉक्सवाला, क्षमा करा. मी आज जरा आजारी आहें. आपल्याशीं चार क्षण आनंदानं घालवतां येत नाहींत म्हणून मला वाईट वाटतं.—स्टँडवरची हॅट उचलून त्यांच्या उत्तराची अपेक्षा न करतां पॅट्रिक भराभर जिना उतरून गेला. क्षणार्धात तो आपल्या खोलींत आला.

मार्गारेटला लिहीत असलेलें पत्र तसेंच मेजावर अपुरें होतें. आवेगपूर्वक पॅट्रिकनें तें फाडून टाकलें. कोंपऱ्यांत तिच्या पत्राचा चोळामोळा पडला होता. पॅट्रिकनें तो आवेगपूर्वक उचलून आपल्या फुटूं पहाणाऱ्या हृदयाशीं धरला.

—मार्गारेट ! मार्गारेट ! क्षमा कर !—एवढेच शब्द हळव्या पॅट्रिकच्या हुंदक्यांतून निघाले.

परिवर्तन

**कुळागर** व्यं. ना. नाईक, बी.ए.

# माझी 'यशोदा.'

श्री. "सुनीळ"

आज विजयादशमी. सकाळींच विष्णुभटजींनीं 'गणपति पूजन' आरंभिलें होतें.

यशोदेनें मला न्हाऊं घातलें. आईनें पेटींतून काढलेले स्वच्छसे कपडे तिनें माझ्या अंगावर चढविले. आज प्रत्येकजण जातां येतांना माझ्याकडे पाहून अर्थपूर्ण हंसत होता! मी यशोदेच्या लुगड्याला धरून सारखा तिच्याभोंवतीं घुटमळत होतों.

—अरे बाळ, उद्यां सासुरवाडीला जातांना असाच यशोदेच्या लुगड्याला धरून जाणार आहेस कीं काय?—आजीनें प्रश्न केला.

यशोदा मनापासून हंसली.—होय म्हणून सांग ना!—तिनें म्हटलें.

परंतु न समजलेल्या प्रश्नांचीं उत्तरें द्यायला मी कुठें अजून मोठा झालों होतों? मी स्वस्थच राहिलों.

मग आजीनें दृष्ट लागूं नये म्हणून माझ्या कपाळाला अंगारा लावला, आणि हाताला धरून नेऊन पाटावर बसविलें. समोर शिर्तीवर * कांहीं तांदूळ व त्यांवर एक भला मोठा नारळ ठेविला होता. भटजीला एवढा मोठा नारळ दिलेला हा मी प्रथमच पाहिला. बाजूला एक गुळाचा लहानसा खडा, एक विडा व त्यांत एक पैसा. जवळच दुसरी एक शिर्ती असून त्यावर भटजी स्वहस्तानें तांदूळ पसरीत होते.

—नमस्कार कर.—भटजी आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणाले.

---

* केळीचें पान.

कोणाला नमस्कार करायचा तें न समजल्यामुळें मी घोंटाळ्यांत पडलों.

आईनें माझी आसनमांडी आंवळून व्यवस्थित केली आणि माझे दोन्ही हात जोडून ते गणपतिपूजनाच्या नारळासमोर करीत ती म्हणाली,—हं. असा देवाला नमस्कार कर. विष्णुभटजी आज तुला ' बलप 'X शिकविणार आहेत.

हें मला आधींच समजलें होतें. तरी भटजींची घरघर मला समजेना. आतां पुढें हें असेंच ' बलप ' शिकविणार आहेत कीं काय? असा प्रश्न मनांत येऊन मला कसेंसेंच झालें.

इतक्यांत बाबा आले. आई उठून उभी राहिली.

—उत्तम विद्या प्राप्त व्हावी म्हणून देवाजवळ प्रार्थना कर.

माझ्याजवळ बसलेली आई उठून दूर उभी राहिल्यामुळें मी अधिकच भांबावलों आणि इकडे तिकडे पाहूं लागलों. भिजल्या वस्त्रानें यशोदा खांबाजवळ उभी होती. तिनें हात जोडले होते. दृष्टि खालीं लाविली होती. तिचा भोळा जीव कोठें स्थिरावला होता, हें त्यावेळीं मला कसें समजावें? मी तिच्याकडे दृष्टि वळविली आहे हें तिनें कोणत्या डोळ्यांनीं पाहिलें, हें एक तिलाच ठाऊक! आमची दृष्टादृष्ट होतांच तिनें वात्सल्यपूर्ण स्मित केलें, आणि पूर्ववत मुद्रा धारण केली. यावेळीं तिनें असा एक संवेदनापूर्ण आविर्भाव केला कीं, त्यांतून मला ती जणूं म्हणत होती, "बाळ, गडबडण्याचं कांहीं कारण नाहीं. देवाला नम्रतापूर्वक हात जाडूने 'माझी कामना पूर्ण व्हावी,' अशी मनांतून त्याची करुणा भाकली म्हणजे झालं!"

माझ्या हातांनीं, मस्तकानें व मनानें एकदमच यशोदेचें अनुकरण केलें.

भटजींनीं नंतर माझा उजवा हात पकडला, आणि शिर्तीवर पसरलेल्या तांदळांवर "श्री" हें अक्षर कसेंबसें लिहविलें. बाबांनीं मला तें उच्चारण्याची सूचना दिली. मग त्या "श्री" वर गंध, फूल, अक्षता, वगैरे वाहून तिची पूजा केली. मधेंच भटजींच्या गडबडींत ' ब्राह्मण दक्षिणा ' हे शब्द कांहींसे जोरानें आले. आईनें ताबडतोब एक रौप्यमुद्रा आणून माझ्या हातीं दिली. मला वाटलें ती मलाच

---

X " बरप ( विद्या ) " ह्या शब्दाचें बोबडें रूप.

दिली असावी. भटजींनीं पळी उचलून माझ्या हातावर पाणी घालण्याचा आविर्भाव केला. मीही रुपया डाव्या हातांत घेऊन उजवा हात पुढें केला. भटजींच्या दृष्टींतून ही गोष्ट सुटणें शक्यच नव्हतें. त्यांनीं पाणी तर घातलें नाहींच, पण काय म्हणत होते तेंही बंद केलें. मी डोळे वर करून पाहिलें. त्यांचें तोंड अर्धवट उघडें होतें, पण ते बोलतहि नव्हते आणि हंसतहि नव्हते. मग त्या मार्गानें त्यांच्या मनांत उद्भवलेला एकादा अनुच्चारणीय विचार निघून गेल्यास नकळे ! शेवटीं त्यांनीं स्वतःच तो रुपया काढून माझ्या उजव्या हातांत दिला, व तो न सोडतां मला त्यावर पाणी सोडावें लागलें !

झालें; पूजा संपुष्टांत आली. " श्री " सह तांदळांची गठडी वळून भटजींनीं मुंडासें व उपरणें लावलेल्या खुंटीकडे दृष्टी वळविली. माझें लक्ष समईवरील ज्योतींच्या स्वैर नाचाकडे लागलें होतें.

—यशोदे, काय ग अशी आ वासून तिथंच उभी आहेस ? तुला कांहीं कामधंदा आहे कीं नाहीं ?—आजीनें प्रश्न केला.

—हं जातें.—असें म्हणून यशादेनें माझ्यावरून दृष्टि काढली. पण मधेंच कांहीं आठवलेंसें करून ती आईकडे वळली. त्यांचें कुजबुजणें मला स्पष्ट ऐकूं आलें नाहीं; तरी मला वाटलें ती माझ्यासाठीं आईजवळ नवी पेन्सिल मागत होती. नंतर तिनें माझी पाटी बोंड्यांच्या पाल्यांनीं स्वच्छ केली, आणि रेडेअणशीच्या दोरीनें तिला एक नवी पेन्सिल बांधून, ती माझ्याजवळ येऊन बसली. पाटी माझ्यासमोर पसरून तिनें आपला प्रेमळ हात माझ्या पाठीवरून फिरविला आणि लाडक्या स्वरांत म्हणाली,—बाळ, आतां लिहून दाखव पाहूं !

स्वच्छ पाटी व नवी पेन्सिल पाहिल्यापासून माझ्या बाळहौसेनें उचल खाल्लीच होती. ऐटींत पाटी सरसावून मी तिच्यावर ओळ मारली.

—अग, इथंच काय रमतेस ? तीं पूजेचीं उपकरणं घांसावयाचीं आहेत ना तुला ? रामा, बाळाला नेऊन याच मुहूर्तावर शाळेंत पोंचवून आलं पाहिजे.—आजीनें पुन्हां इशारा दिला.

सणाचा दिवस. काय करते बिचारी ! पायली, पांसरी, मुसळ, कोयती,... आणि एकंदर पूजापात्रें धुऊन स्वच्छ करून तिला ठेवायचीं होतीं. देव्हाऱ्यांतील

सर्व देवांना आज सचैल स्नान घालावयाचें असल्यामुळें बाबा लवकरच आंघोळ करून पूजेला बसायचे.

—लिही. मी आलें हं!—असें म्हणून ती माजघराकडे वळली. परंतु आज तिचें मन आपल्या कामाकडे लागेना.

रामाला विनवून तिनें आपलें काम त्याच्याकडे सोंपविलें आणि झटपट दुसरें लुगडें नेसून ती स्वतःच मला शाळेंत पोंचविण्यासाठीं सज्ज झाली.

मलाही आनंद झाला. तांबडी फीत लटकावलेली पाटी तिनें माझ्या खांद्यावर चढविली आणि मला उचलून घेण्यास हात पुढें केले. पण आज तिच्या कडेवर बसणें मला कसें पसंत पडणार ? तिचा हात पकडून मी चालायला लागलों. आज नवीनच जोडे पायांत चढविल्यामुळें मी अडखळतच चाललों होतों.

वीस पंचवीस पावलें चालून गेलों तरी यशोदा पुनः पुनः मागें वळून काय पहाते याबद्दल मला कुतूहल उत्पन्न झालें. दरवाजांत बाबा, आई, आजी, मावशी आणि पलीकडे रामा गडी, माझें दादामास्तरांच्या शाळेवरील प्रथमाक्रमण कौतुकपूर्वक पहात होतीं.आणि आपापसांत त्यांची कांहीं टीकाही चालली होती. ( मला ती अर्थात समजली नाहीं. )

मान वर करून मी यशोदेच्या तोंडाकडे पाहिलें. पराक्रमी महायोद्धयाच्या कुशल सारथ्याप्रमाणें तिच्या मुखावर अभिमान आणि विश्वास यांचें प्रभावी संमिश्रण विलसत होतें.



श्रीरवळनाथाच्या प्रशस्त सोंडया*वरील दादा मास्तरांची ती शाळा ! शाळेंत चार इयत्तांपर्यंत म्हणजे बालबोध क्रमिक चौथ्या पुस्तकापर्यंत शिकणारे विद्यार्थी होते. पण यापुढील शिक्षणाचीहि सोय आमच्या गांवीं होती. कारण पहिल्या चार इयत्तांप्रमाणेंच इतर कोणत्याहि इयत्तेचा विद्यार्थि आल्यास, त्यासहि आपण उत्तम 'तयार करूं,' असें दादामास्तरांनीं गांवांत पाय ठेवतांच जाहीर केलें होतें. आमच्या ग्रामस्थांचा दादामास्तरांच्या योग्यतेवर व दादामास्तरांचा आमच्या

* देवालयाचा पुढील दर्शनी भाग.

ग्रामस्थांच्या शैक्षणिक अपेक्षेवर इतका परस्पर विश्वास होता कीं, दादामास्तरांच्या हयातींत मराठी शिक्षणाची गैरसोय होते, असें म्हणणारास सर्वांनीं वेडयांतच काढलें असतें !

शाळेंत अवघीं वीस-पंचवीस मुलें होतीं. सोंडयाला चारी बाजूंनीं चांगले दगडी सोपे होते. परंतु मुलांना वर बसण्यास मज्जाव असे. त्यांनीं खालीं सोप्यास टेंकून बसलें असतां, त्यांचें चित्त बाहेरच्या हालचालींकडे आकर्षिलें जात नाहीं, असें मास्तरांनीं ठरविलें होतें. उजव्या बाजूच्या सोप्यावर मास्तर आणि डाव्या बाजूस गांवांतील कांहीं व्यवसायशून्य मंडळी बसत आपले गांवकुटाळक्या करीत ! आमच्या दादामास्तरांचीं तीं चालतीं बोलतीं वर्तमानपत्रें होतीं म्हणा ना ! सगळ्या गांवचें वर्तमान त्यांना बसल्या ठिकाणीं मिळण्याचीं तीं चांगलींच साधनें होतीं. दर महिना एक रत्तल तंबाखू वर्गणी भरावी कीं झालें ! अन् मग मास्तरांबरोबर त्यांचें मन:पूर्वक गुडगुडी*पान सुरू होई. आमचे बाबा त्यांना ' रवळनाथाचीं कुळें ' म्हणत.

मध्यभागीं हंडया लावण्यासाठीं एक चौदळी + होती. पण बाहेर कुठें हंडी दिसत नसे. चौदळीच्यावर तुळईला एक दोरी मात्र लोंबकळत होती. खुद्द श्रीरवळनाथ काळोखांतच बसत. भिंतीवर एक लांकडी वस्तु लटकत होती. वडे तळण्याच्या पळीसारखा तिचा आकार होता. दादामास्तरांच्या शिक्षा-शास्त्रांतील तें एक अत्युपयोगी उपकरण होतें. ( हें मला मागाहून समजलें. )



आम्ही शाळेंत पोंचलों त्यावेळीं मास्तर तावातावानें प्रतिपादीत होते.—अरे, तीं सरस्वतीपूजनें, त्या प्रत्येक सणाला सुट्टया, यांचा अनिष्ट परिणाम दिसायला मुलांचा त्या दिवसांतला उल्हास बघितला म्हणजे झालं. असला धागडधिंगा मी माझ्या शाळेंत मुळींच चालूं देणार नाहीं ! (प्रत्येक तासाला खेळ. तेही मास्तरांच्या सहकार्यानें ! कवाईत, व्यायाम, संवाद, गाणीं, सहली, इ. चालू जमान्यांतले प्रकार पाहायाला मास्तर बिचारे जगले नाहींत.)

---

* गोमंतकांतील विशिष्ट प्रकारचा हुक्का. + चौपायी.

—अंऽ ? हं ! वासूबाब काल माझ्याजवळ बोलले होते खरं !—गुरुजी आमच्या स्वगताप्रीत्यर्थ स्मितपूर्वक म्हणाले.

—काय शिकतोस ?—गुरुजींनी माझ्या खांद्यास लटकत असलेल्या पाटीस हात घातला. मी यशोदेचे ओचे घट्ट धरून दुसरीकडे पाहूं लागलों.

शाळेंत माझ्या ओळखीचीं बरींच मुलें होतीं. सावित्रीमावशीचा विठू मजकडे पाहून हंसत होता. आपल्या बाजूला त्यानें एक फुंकर मारली,—माझ्या नव्या कपड्यांची त्याला दया आली असावी—आणि मला आपल्या जवळ बसण्यास त्या जागेवर हात मारून सूचना दिली. मलाही तीच निर्मळ जागा पसंत पडली.

थोडासा पलीकडे एक तुटलेल्या बटणांचा अंगरखा घातलेला दणकट मुलगा बसला होता. उगीच जीभ बाहेर काढून हा मला कां वेडावतो, हेंच मला समजेना. त्याचें आणि विठूचें भांडण झालें होतें, हें मला मागाहून समजलें.

कितीतरी मुलें माझ्याकडे पाहून क्षणभर आपली परिस्थिति विसरलेलीं दिसलीं. त्यांचे ते लुकलुक करणारे डोळे—दडपलेल्या मनोवृत्ति व्यक्त करण्याचें एकच साधन—माझ्याभोंवतीं पिंगा घालीत होते. मी मुग्धच होतों, तरी विठूकडे पाहून माझ्या हृदयांत चमकलेला आनंद माझ्या डोळ्यांच्या खिडकींतून त्याला दिसला असावा.

मी जरी कायदेशीररीत्या विद्यार्थि आजच बनलों होतों तरी आईनें मला सगळ्या बाराखड्या, दोनशेंपर्यंत अंक आणि चारपर्यंत पाढे म्हणायला व लिहायला शिकविले होते. गुरुजींनीं माझ्या पाटीवर 'श्रीगणेशायनमः' हीं अक्षरें ओळ न तोडतां लिहिलेलीं पाहिलीं आणि मघांच्या दणकट व वेडावणाऱ्या मुलाच्या खालीं मला बोटानें जागा दाखविली.

आणि काय आश्चर्य ! एवढ्यानें त्या मुलाला इतका आनंद झाला कीं आपल्या दप्तराचा फडका सोडून तो मजकरतां निश्चित झालेल्या जागेवर त्यानें पसरला. माझें मन द्विधा झालें. अशा स्थितींत यशोदेनें मला तसाच उचलून मास्तरनीं दाखविलेल्या जागीं बसविलें. विठू बिचारा खजील झाला. बसतां बसतां मी अत्यंत केविलवाण्या स्वरांत यशोदेला म्हणालों,—तूं ही बैस !

मुलांच्या तीक्ष्ण श्रवणेंद्रियांतून माझें हें वाक्य कसचें सुटतें ? सगळीं मुलें

खो खो हंसत सुटलीं !

मास्तरना या हंसण्याचें कारण समजणें शक्य नव्हतें. माझ्यासारख्या नवागत विद्यार्थ्यासमोर या हंसण्यानें मुलांकडून आपली अमर्यादा झाली, असें त्यांस वाटलें असावें.—गाढवांच्या कांद्यानों....

यशोदेच्या लुगड्याला मी पुन्हां घट्ट धरलें. माझ्या रांगेंतील मुलांच्या पाठीवर चम् चम् आवाज होऊन ते विवळूं लागले.

— सोडतोस कीं नाहीं ?—घनगर्जना झाली.

माझ्या शेजारच्या त्या दणकट मुलानें—त्याचें नांव पुंड्या—मास्तरांची छडी पकडली होती. त्याच्या धैर्याचें मला कौतुक वाटलें.

इतक्यांत बाहेरून "होगया ! होऽगया ! होऽऽगया !" असा ध्वनि ऐकूं येऊं लागला.

—सोड, मारीत नाहीं.—मास्तरांनीं छडी परत मिळविली.

आम्हां सगळ्याचेंच लक्ष या गडबडीनें वेधून घेतलें होतें. गुरुजी स्वस्थानावर जाऊन सशस्त्र उभे राहिले. या संधीचा फायदा घेऊन यशोदेनें मजपासून आपली सुटका करून घेतली, आणि सोंड्याच्या पायऱ्यांवर राहून हें नवीन प्रकरण काय आहे तें तीहि उत्सुकतेनें पाहूं लागली.

गडबड करणारे सगळे विद्यार्थीच होते. मध्यें एक मुलगा अधोमुख चालला होता. त्याच्या डोकीवर दप्तर व गळ्यांत हाराप्रमाणें लटकणारी पाटी दिसत होती. भोंवतीं पांचसहा मुलें उत्साहानें उड्या मारीत चाललीं होतीं. कोणी त्याच्यावर अडुळशाच्या चवऱ्या ढाळीत, कोणी पोपईच्या दांड्याचे कर्णे फुंकीत. एकानें त्याच्यावर पत्रावळीची छत्री धरली होती. दुसऱ्यानें केळीच्या पानाची अबदागीर उभारली होती, आणि तोंडानें सगळ्यांचाच शंख चालू होता !

"खोंट+ मारतो, मास्तर." "शिव्या देतो, गुरुजी..." "थुंकतो, गुरुजी." "चाळवितो,* मास्तर..." शेंके× मारतो, गुरुजी..." सरंजामवाल्यांच्या तक्रारी चालू झाल्या. गुरुजी संतापानें लाल झाले होते.

---

+ लाथ. * वेडावतो. × बारीक दगड.

—एकेकाची चामडीच लोळवीन ! उगीच कोकलतां कशाला ?

जो तो आपापल्या जागेवर जाऊन बसला. भीति, लाज, विषाद, कोणत्याच विकाराचें एकाच्याहि तोंडावर चिन्ह दिसेना !

—बेरडा, काल केली तेवढी पूजा पुरी पडली नाहीं काय ? पाहिलं तर गोगलगाईसारखा गरीब दिसतोस; पण तुझ्यासारखा आंतल्या पायाचा निगरगट्ट पोरगा मला उभ्या आयुष्यांत भेटला नाहीं. चढ त्या चौदळीवर... तुला आतां ' गोळावर ' चढवितों आणि एकाच ठिकाणीं असा मार देतों कीं जन्मभर आठवण राहावी* !

—नाहीं, गुरुजी.

—नाहीं, काय ?

—होय, गुरुजी.

—होय, काय ?

—नको, गुरुजी.

—नको, काय ?

प्रत्येक प्रश्नाबरोबर गुरुजींच्या आवाजाची तार चढत होती, आणि तो मुलगा त्यांच्या प्रत्येक आविर्भावाप्रमाणें अंग मोडून, ज्या ज्या ठिकाणीं छडी लागण्याचा संभव होता, तीं तीं ठिकाणें चोळीत होता.

—बघ कसा निर्लज्ज, मारण्याच्या आधींच अंग चोळतो आहे !—मास्तरनीं एक छडी हाणली, त्यासरसी त्या मुलानें चौदळीच्या पलीकडच्या बाजूस उडी मारली. गुरुजींचा हात नेम चुकल्यामुळें किंचित् चौदळीला आदळला. त्याबरोबर त्यांनीं रुद्रावतार धारण केला. छड्यांचा सपाटा सुरू झाला.

—हुमले × आणा रे...

तोंडावर हात मारून त्या वस्तादानें पांचजन्य सुरू केला. मला तें रुद्रतांडव पहावेना. मी डोळे झांकले. तरी मास्तरांची उग्र मूर्ति माझ्या डोळ्यांपुढून हलेना.

---

* हा एक इंक्विझिशनच्या पद्धतींतून घेतलेला शिक्षेचा प्रकार आहे म्हणतात.

× मुंगळे.

माझा धीर सुटला. गुरुजींच्या बाजूनें डोळ्यांवर हात धरून मी यशोदेकडे धूम ठोकली !



माझ्या पलायनामुळें गुरुजींनीं हात आटोपला. अंमळशानें वातावरण शांत झालें. गुरुजी मला मारावयाचे नाहींत, असें यशोदा आणि तेसुद्धां मला बजावीत होते. परंतु गुरुजी यशोदेला फसवून मलाही फसवूं पहात आहेत, असेंच माझी मनोदेवता मला सांगत होती.

तरी यशोदेच्या प्रेमळ आग्रहामुळें माझें कांहींच चालेना. तिला लवकर घरीं जावयाचें होतें. आज विशेष कामाचा दिवस. आजी, आई, उशीर केल्यास तिला रागें भरणार होत्या. शिवाय घरचीं कामें आटोपून मला न्यायला परत येण्याचें तिनें कबूल केलें होतें. शेवटीं मी तोंड उघडलें.—मीहि येतों.

माझ्या कंठांतून कळवळून निघालेला तो स्वर ऐकून तिचें तोंड गोरेंमोरें झालें. दुखऱ्या जागेवरून हळूच हात ओढावा त्याप्रमाणें तिनें माझ्या गळ्यावरून बोटें फिरविलीं.

—तुला घेऊन परत गेल्यास घरची मंडळी मला रागें भरणार नाहीं काय ?

मला भडभडून येतेंसें वाटलें. पण डोळ्यांवाटे अश्रू बाहेर पडेनात कीं तोंडांतून शब्दहि उमटेना !

खात्री असल्याशिवाय यशोदा मला मास्तरच्या स्वाधीन करून जाणार नाहीं. ....मी स्वतःचें समाधान करूं लागलों.

निदान पहिल्या दिवशीं तरी मास्तर मला मारणार नाहींत !...

हें सगळें खरें तरी त्या शाळेंत मला बसावेंसें वाटेना. आणि असें कां तें मला यशोदेला सांगतांहि येईना. शेवटीं मांडीवर पाटी व हातांत पेन्सिल घेऊन मी विद्यार्थ्यांचा अभिनय करूं लागलों. व मजकडे पाहात पाहात यशोदा जड पावलांनीं पायऱ्या उतरली. हळू हळू ती मला दिसेनाशी झाली.

कदाचित् माझी मुखचर्या फारच मलूल दिसली असावी. विठूनें आपल्या दप्तरांतून एक चकचकीत चित्र काढून खुणेनेंच तें मला देण्याचें अभिवचन दिलें. तें पाहून पंड्याहि आपलें पुस्तक धुंडाळूं लागला. तो शोधीत असलेली

वस्तु त्याला मिळाली नाहीं.—मी तुला त्याच्याहीपेक्षां चांगलं चित्र देईन ! त्याचं घेऊं नकोस. — पुंडथानें मला कानांत सांगितलें.

शाळेंत एकच मुलगी होती. माझ्यापेक्षां वयानें ती किंचित् मोठी होती. तीहि वारंवार मजकडे पाही. तिच्या दृष्टींत पराकाष्ठेचा आत्मीयभाव भरलेला होता. पण तिला माझी दया येते, या कल्पनेनें मला लाजच वाटूं लागली. बरींच मुलें मला खुणांनींच धीर देत होतीं.

मघांच्या मास्तरांच्या दूतांपैकीं दोघे मजकडे उपहासपूर्वक पाहात होते.

आणि काय नवल ! त्यांनीं " होऽगया " "होऽगया" करीत हांकून आणलेलें तें द्विपाद जनावर, तोंड पुस्तकाकडे पण दृष्टि माझ्याकडे वळवून मिस्किलपणें हंसत होतें.

शाळेच्या त्या चिमुकल्या जगांत जीवांचे किती तरी नमुने हे !

तिकडे गुरुजी चौदळीवर आपटलेलीं बोटें वारंवार चोळीत व आपली सूडाची भेदक, अतृप्त दृष्टि त्या मुलाकडे फेकीत.

डाव्या सोप्यावर बसणाऱ्या मंडळींत कोठल्याशा मुलीच्या लग्नांत हुंडा किती दिला असावा, या विषयावर मतभेद होऊन खडाजंगी चालली होती.

—शंकूऽऽ !—मास्तर ओरडले. सर्कशींतल्या जनावराप्रमाणें खुणेची हांक कानीं पडतांच टुण्दिशीं उडी मारून एक लंगडा मुलगा ( आमच्या शाळेंत हा एकच एक चवथीचीं पुस्तकें वाहणारा विद्यार्थि होता.) उठला. तो कोंपऱ्यांतील गुडगुडी उचलून साजू गुरवाच्या घरून विस्तव वगैरे घालून ती सज्ज करून घेऊन आला. या गोड संधीचा फायदा घ्यावा म्हणूनच कीं काय गुरुजींच्या पुढें तो मिस्किल मुलगा करंगुळी दाखवून म्हणाला, —मास्तर एकी ऽ !

गुरुजींना आलेली कळ अजून थांबली नव्हती. गुडगुडी आली असतांहि त्यांनीं नळीला घालावयाचा हात छडीला घातला. त्या बेरडानें प्रसंग जाणून ताड्दिशीं आपल्या जागेवर उडी मारली, आणि मान धडांत कोंबून व ओंठा–कपाळाचे स्नायू ताणून डाव चुकल्याचा आविर्भाव केला !

गुडगुडी समोर दिसल्यामुळें रवळनाथाच्या कुळांच्या गांवकुटाळक्या व खिदळणें बंद झालें. नवरात्रोत्सवांत मखरांतील आरत्यांचें वाद्य बंद झाल्यावर

कानांत ज्याप्रमाणें 'सुन्न' असा आवाज होतो आणि त्याबरोबरच मृदंगाचे गोड गोड ठोके कानावर पडतात, त्याप्रमाणें त्या वाद्यकल्होळाच्या समातीबरोबरच गुडगुडीचा वाढता आवाज ऐकूं येऊं लागला.

माझी मात्र चुकलेल्या पाडसापेक्षांहि केविलवाणी स्थिति झाली!

र्‍हस्व, दीर्घ, अतिदीर्घ, यथास्थित झुरके मारून झाल्यावर गुरुजींनीं थुंकण्यासाठीं सोप्याच्या मागील बाजूस मान वळविली आणि थवकल्यासारखें केलें.

—छे!—गुरुजी कोणाशीं तरी बोलूं लागले.

—छे! छे! नाहीं!......तूं निश्चिंत चल आपल्या कामाला...... हें काय?... कधींच नाहीं! छे! तो आनंदांत बसला आहे, बघ!

गुरुजींनीं मजकडे बोट दाखविलें. मला कायसा भास झाला. ताडकन् मी उठून उभा राहिलों.

ती यशोदा होती. मला विद्यामंदिराच्या दारांत पोंचविणारी ती माझी 'यशोदा' होती. माझ्या यशोदेनें गुरुजींना हात जोडले होते, आणि तिची प्रेमविव्हल, कारुण्यपूर्ण दृष्टि दुथडी भरून वाहात होती!

माझी 'यशोदा.'
"सुनीळ"

कुळागर

# राण्याची कहाणी.

प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई.

राण्याच्या बंडासंबंधीं बोलतां बोलतां गोष्टी निघाल्या आणि शिंगुबाबांनीं शेवटच्या बंडांतील आपला एक रोमांचकारी अनुभव सांगायला सुरवात केली. त्यांच्या तोंडून निघणारी प्रत्येक कहाणी आम्ही मुलें मोठ्या उत्सुकतेनें, कुतूहलानें ऐकत असूं. कारण त्यांचें जीवनच वीरवृत्तीचें होतें. आणि अशा विविध, उत्कट जीवनांत त्यांना वेळोवेळीं जे प्रसंग अनुभवायला मिळाले होते त्यांचें वर्णन करतांना ते विषयाशीं समरस होऊन जात; त्यांच्या गंभीर, रांकट व निर्भय चेहऱ्यावर विलक्षण उल्हास खेळूं लागे; त्यांच्या थकलेल्या नेत्रांत तारुण्याचें चैतन्य रसरसूं लागे. शब्दांबरोबरच त्यांच्या अवयवांच्या हालचालींतून मूर्तिमंत वीररस प्रकट होत असे; आणि त्यामुळें आमच्यासारखे श्रोते त्यांच्या कथनांत रंगून जात असत.

'तो काल मोठया धामधुमीचा होता.' शिंगुबाबांनीं प्रारंभ केला. 'एखाद्या टोळधाडीनंतर निसर्ग बेचिराख होऊन जावा तद्वत बंडखोरांचा लोंढा एखाद्या गांवांतून निघून गेला म्हणजे त्या गांवांत हाहा:कार उडत असे. लुटालूट, जाळपोळ, मारहाण कांहीं विचारूं नका! एरवीं माणसाप्रमाणें वागणारे बंडखोर त्या वेळीं राक्षस बनत. आज एक गांव तर उद्यां दुसरा, असा त्यांचा लुटालुटीचा क्रम होता. त्यामुळें कोणत्या गांवावर केव्हां संकट येईल त्याचा नेम नसे. मरणाची, बेअब्रुची धुगधुग सगळ्यांच्या हृदयाला जाळीत असायची. अशाच वेळचा माझा एक अनुभव मी तुम्हांला आतां सांगणार आहें.'

ते थोडा वेळ थांबले. अंधाराची रहस्यमयता निसर्गावर पसरूं लागली. जवळच्या नदीच्या पाण्यांत तीरावरच्या झाडांच्या काळ्याभोर सांवल्या हालूं लागल्या. दूरच्या झाडींतून कोल्हेकुईचा कर्णकटु आवाज निघूं लागला.

‘ आणि एक दिवस अकस्मात् दुपारच्या वेळीं बंडवाल्यांनीं आमच्या गांवावर छापा घातला. बंडखोरांचें शक्य त्या उपायांनीं पारिपत्य करण्याचें आम्ही कांहीं मंडळींनीं आधींच ठरविलें होतें. त्याप्रमाणें गांवांत त्यांचा प्रवेश होत आहे असें कळतांच वाड्यावरची बरीच मंडळी आमच्या घरांत गोळा झाली. आमच्याकडे दहा पंधरा तोडयाच्या चांगल्या बंदुका होत्या आणि दारूसामानहि भरपूर होतें. बंदूकीचा बिनचूक नेम मारणारेही दहा पंधरा तरुण होते. घराचीं दारें बंद करून आम्ही पंधरा वीस पुरुष मंडळी बंदुका घेऊन वेगवेगळ्या ठिकाणीं बसून राहिलों. बंडवाल्यांनीं घराला वेढा दिला. आणि दरवाजा उघडत नाहीं असें पाहून त्याच्यावर कुऱ्हाड चालविली. त्यांची बाहेर चालू असलेली आरडाओरड आणि अभद्र शिव्याशाप आम्हांला ऐकूं येत होतेच. दारांना व भिंतींना मुद्दाम राखलेल्या भोंकांतून आम्हांला बंडवाल्यांची सगळी हालचाल दिसत होती. बंडवाल्यांची जाळपोळ व अत्याचार करण्याची तयारी पाहून माझ्या सोबत्यांना मी गोळ्या झाडण्याची सूचना केली. त्याबरोबर लागोपाठ पंधरा वीस बार झाले आणि आमच्या अंगणांत आठ दहा बंडवाल्यांचे पडलेले मुडदे आम्हांला दिसले. हा अनपेक्षित गोळीबार झालेला पाहतांच इतर बंडवाले भीतीनें गांगरून सैरावैरा पळूं लागले. आणि थोड्याच वेळानें त्यांनीं गांव सोडला.

‘ ह्या प्रकरणांत कल्पनातीत विजय मिळाल्यामुळें आम्ही कांहीं दिवस निश्चिंत होतों. बंडवाले आतां कांहीं आमच्या वाटेस जात नाहींत अशी आमची समजूत झाली. परंतु दहा पंधरा दिवसानंतर घडलेल्या प्रकारामुळें आम्ही स्तिमितच होऊन गेलों.

‘ पहाटेची वेळ होती. अजून उजाडलें नव्हतें. इतक्यांत गांवांत ठिकठिकाणीं आरडाओरड व धांवपळ सुरू झाली. मी दरवाजा उघडून धांवतच बाहेर आलों. इतक्यांत आठ दहा बंडवाले पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें घरांत शिरले. त्यांचे चित्रविचित्र पोषाख, भयानक मुद्रा आणि त्यांच्या हातांत तळपणारीं शस्त्रास्त्रें पाहून मी क्षणमात्र गांगरून गेलों. परंतु लगेच धीर करून मी घरांत धांवलों. इतक्या अवधींत घरची मंडळी कावरी बावरी होऊन खोलीच्या एका कोपऱ्यांत जमा झाली होती, आणि आमच्या कुलदेवतेचें नामस्मरण करून रडत

होती. मी त्यांना धीर दिला.

'बंडवाल्यांनीं घरांतील बरीच चीजवस्त हस्तगत केली होती. परन्तु त्या गडबडींत तिकडे कुणाचेंहि लक्ष नव्हतें. त्या संकटांतून घरचीं माणसें सुखरूप कशीं निभावतील हीच मला चिंता लागली होती.

'दोन बंडवाले आम्ही होतों त्या खोलींत शिरले आणि त्यांपैकीं एकानें दागिने काढण्याच्या हेतूनें माझ्या आईचा हात पकडून खसकन् ओढला व अंगावरील दागिने उतरून ताबडतोब देण्यास सांगितलें. तें पाहून संतापानें माझें भान हरपलें. मी चटकन् कोंपऱ्यांतली बंदूक काढली आणि ती उभारून त्याच्यावर गोळी झाडणार इतक्यांत त्या दोघांनींहि माझे दंड पकडून मला गिरफदार केलें. माझी सगळी धडपड व्यर्थ गेली. त्यांच्या सहाय्याला त्यांचे इतर सोबती आले आणि त्यांनीं मला पकडून ठेवलें.

'थोडया वेळानें बंडवाले रस्त्यावर जमा झाले आणि त्यांनीं शिंगाला फुंक घातली. त्याबरोबर गांवांत पांगलेले त्यांचे इतर सोबती तेथें हळुहळू दाखल होऊं लागले. या जमावांत गांवचे दोन प्रतिष्ठित वृद्ध गृहस्थ पकडून आणलेले मला दिसले. मी मनांत म्हटलें, 'आतां मृत्यूशीं झुंज खेळायची.'

'फिरून शिंगाला फुंक पडली आणि पन्नास साठ इसमांच्या त्या टोळीबरोबर रानाच्या दिशेनें आम्ही चालूं लागलों.

'आम्ही रानांत पोंचलों तेव्हां अकरांचा सुमार होता. सूर्याचे किरण प्रखर झाले होते आणि दिवस एप्रिल महिन्यांतील असल्यामुळें अतिशय उष्मा होत होता. वाट दगडधोंडयांतून आणि कांटेरी झुडपांमधून गेली होती. सभोंवती मोठमोठ्या झाडांच्या असंख्य फांद्यांच्या जाळ्या दिसत होत्या. उंच सखल जमिनींतून ओहोळांचीं शुष्क पात्रें दिसत होतीं.

'आम्ही हळुहळू एका मोठ्या डोंगराची चढण चढत होतों. मला माझ्या जीविताची पर्वा नसली तरी घरच्या मंडळीचा प्रश्न मला क्षणाक्षणाला भेडसावीत होता. आणि त्याहीपेक्षां माझ्या मागून कष्टानें चालणाऱ्या दोघां म्हाताऱ्यांची स्थिति पाहून मला अतिशय दुःख होत होतें. आम्हां तिघांचेंहि जीवित संकटांत सांपडलें होतें. गांवांतील तीन प्रमुख घरांतील आम्ही कर्ते पुरुष होतों. आणि बंडवाल्यांचें

जें भयंकर पारिपत्य आम्ही केलें होतें, त्याचें उट्टें काढण्यासाठींच आम्हांला अज्ञात स्थळीं नेण्यांत येत होतें.

' माझे म्हातारे सोबती धक्के दिल्याप्रमाणें चालत होते. कल्पनातीत भयाण अशा शारीरिक व मानसिक दुःखाचा ते अनुभव घेत होते. तारुण्याचा उन्माद मृत्यूशीं झगडण्याची ताकद मला देऊं शकत होता. परंतु त्यांचें वार्धक्य त्यांना अगतिक, निराश बनवीत होतें. ते कांपत होते आणि त्यांच्या अंगांतून घामाच्या धारा निघत होत्या. एखादे वेळीं ते मध्येंच खिळल्याप्रमाणें थांबत, आणि हृदयाचें पाणी पाणी करून टाकणारे आपले नेत्र मागें वळवून कल्पनेला दिसणाऱ्या आपल्या घरादारावर, आपल्या बायकांमुलांवर स्थिर करीत. त्यावेळीं मागें चालणारे बंडवाले त्यांच्या पाठींत किंवा कंबरेंत बंदुकीचा दस्ता हाणीत. अशा वेळीं त्यांच्या तोंडून निघणारे कळवळ्याचे उद्‌गार मला असह्य होत आणि मी क्रुद्ध नजरेनें त्यांच्याकडे वळून पाहीं.

' आमच्या टोळीचा मुख्य रामचंद्र राणे या नांवाचा एक पोक्त इसम होता. पण तो नामधारीच. टोळीच्या सगळ्या हालचाली विसाजी नांवाच्या एका मस्त बंडखोराच्या इच्छेनुरूप होत हात्या. आपल्या कनिष्ठ साथीदारांना व पकडलेल्या इसमांना तोच मारहाण करी. कोणत्या वाटेनें टोळीनें जावयाचें हें तोच ठरवी. तो जातीचा राणा नव्हता. त्याचें स्वरूप आणि त्याचे गुण पाहिले म्हणजे तो अडाणी, हलकट जातींत जन्मला आणि वाढला असावा असें तेव्हांच दिसून येई. त्याचा पोषाख त्याच्या रूपाप्रमाणेंच भयानक होता. ढुंगणाला एक तांबड्या रुंद किनारीचें मळकट धोतर, अंगांत आंखूड बाह्यांचा काळा डगला, माथ्यावर एक तांबडी टोपी, गळ्यांत काळे जाड आठ दहा दोरे, डाव्या हातांत एक रुप्याचें भलें मोठें कडें, पायांत दोन दोन इंच जाड तळांच्या राक्षसी वहाणा, खांद्यावर त्याची ती बंदूक आणि कंबरेला दीड हात लांब पात्याचा सुरा, अशा थाटांत ती स्वारी जमावाबरोबर आपले क्रूर मोठाले डोळे सगळीकडे फिरवीत चालूं लागली म्हणजे कोणाही मनुष्याला त्याची भीतीच वाटायची.

' विसाजी बंदिवानाकडे क्रूरतेनें पाहूं लागला म्हणजे रामचंद्र राण्याच्या नजरेंत कारुण्याची सौम्य चमक उत्पन्न होई, त्याचा गंभीर चेहरा दारुण दुःखानें मलूल

होई. आणि विसाजीचें वर्तन असह्य झालें म्हणजे सहनशीलतेचा बांध फोडून त्याचें मन त्वेषानें तडफडूं लागे, अन् त्याच्या तोंडून विसाजीचा धिक्कार करणाऱ्या स्वरांत उद्‌गार निघे, “ विसाजी ! आमचो सत्यानाश करतोलो तूं तुज्या या कर्मान.” अशा या धिःकाराच्या वेळींच विसाजी अधिक भयाण दिसे. कारण आपल्या नायकानें सगळ्यांच्या समक्ष आपल्याला तुच्छतेचे, तिरस्काराचे शब्द बोलावे हें त्याला खपत नसे. तरी पण गलितगात्र दिसणाऱ्या त्या म्हाताऱ्याच्या शब्दांची धार त्याचा सगळा ताठा कातरून टाकायला समर्थ होती.

‘ राण्याचें सौजन्य मी लवकरच मोजलें. आणि त्या सौजन्याच्या जोरावरच आपल्याला या संकटांतून मुक्त होतां येईल अशी मी खूणगांठ बांधली.

‘ चालतां चालतां एका अवघड ठिकाणीं माझा एक सोबती—सदूभाऊ थांबला. त्याच्यानें पाऊल पुढें टाकवेना. मला पाहून तो लहान मुलाप्रमाणें रडूं लागला. इतक्यांत विसाजीनें त्याच्या कंबरेंत बंदूक हाणली. श्रमानें जर्जर झालेला म्हातारा कोलमडून खालीं पडला. ‘ देवा ! ’ हा निर्वाणीचा शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडला तेवढाच. त्यानें हालचाल केली नाहीं. तो तात्काल गतप्राण झाला.

‘ त्याच्याजवळ जाऊन राणा त्याच्या शवावर वांकला, तेवढ्यांत त्याच्या नेत्रांतून दोन अश्रू ओघळून सदूभाऊच्या देहावर सांडलेले मला दिसले. राण्याचा चेहरा कसल्या तरी पश्चात्तापानें भरून गेला. अवघ्या पांच दहा मिनिटांत हा प्रकार घडून आला. आणि नंतर सदूभाऊचें प्रेत तेथेंच टाकून टोळी पुढें चालूं लागली.

‘ दोन तीन तास आम्ही याप्रमाणें चालत होतो. रामचंद्र राणा माझ्यापुढें चालत होता. तो फिरून फिरून माझ्याकडे वळून पाही. चालतांना बोलण्याचा त्याला भारी नाद होता. मी संभाषणांत वाकबगार असल्यामुळें त्याचें लक्ष मी माझ्याकडे लगेच वेधून घेतलें. मला हवी असलेली गोष्ट राण्याचें मन काबीज केल्याशिवाय घडणें शक्य नव्हती.

‘ आम्ही एका माळरानावर पोंचलों. तेथें पिंपळाचा एक पार होता. त्यावर आम्ही उतरलों. बंडवाल्यांनीं लुटून आणलेली चीजवस्त एका जागीं गोळा केली. रोकड नाणें एका ठिकाणीं ठेवलें. आणि सगळेजण स्वयंपाकाच्या तयारीला लागले.

‘तासाभरानें जेवण झाल्यावर बंडवाले जिकडे तिकडे बसले. रामचंद्र राण्यानें

आधीं ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणें रोकड वांटली. नंतर नेहमींच्या पद्धतीप्रमाणें जमलेल्या दागिन्यांच्या लिलांवाला सुरवात झाली. राण्यानें एकेक दागिना वर उचलावा त्याची किमान किंमत तोंडानें उच्चारावी, लगेच कोणीतरी त्या किंमतींत वाढ करावी, आणि नंतर जास्तींत जास्त किंमत देणाऱ्याला तो दागिना बहाल करावा, असा क्रम चालला. राण्यानें हातांत एक बुगडीचा जोड घेऊन पुकारा केला. तो दागिना पहातांच मी दचकलोंच. माझ्या आईच्या आवडीचा दागिना होता तो. विसाजीनें पहिला शब्द टाकला. राण्यानें जोड हलवीत म्हटलें.

'—बुगड्यांचो जोड दोनशें रुपयांक वता.

' सगळी मंडळी तटस्थ झाली. कोणीहि दुसरा शब्द टाकला नाहीं. राण्यानें थोडा वेळ वाट पाहून म्हटलें, —पहिली खेप...दुसरी खेप...

' मला कुठून बुद्धि झाली कुणाला ठाऊक. मी अकस्मात बोलून गेलों,—म्हजे तीनशीं.

'सगळ्यांनीं आश्चर्यानें माझ्याकडे पाहिलें. विसाजीचें तोंड काळें ठिक्कर पडलें. त्याचा मी भयंकर पाणउतारा केला अशा अर्थाच्या मुद्रेनें त्यानें माझ्याकडे पाहिलें. त्यानें चटकन् आवेशाच्या भरांत बंदुकीला हात देखील घातला; पण लगेच रामचंद्र राण्यावर नजर जातांच त्याचा हात खालीं आला. त्यानें संतापानें आपले ओठ चावले आणि हळूच एक हिडीस शिवी मला दिली.

' राण्यानें जोड माझ्यापुढें करीत हंसत हंसत म्हटलें,—शाबास बामना !

' इतर बंडवाल्यांनीं जोरानें टाळ्या वाजविल्या. विसाजीच्या डोळ्यांत सूडाची चमक तळपली. मी क्षणमात्र भिऊन गेलों.

' थोडया वेळानें बंदुकीचा बार ऐकूं आला आणि आमच्या जमावांत गडबड उत्पन्न झाली. सगळ्यांनीं आसपास पाहिलें. बंडवाल्यांवर सरकारपक्षीय सैनिक गोळीबार करण्याच्या हेतूनें जवळपास दडून बसले असावेत यांत शंकाच नव्हती. बंडवाल्यांनीं चारी दिशांनीं बंदुका झाडल्या. मनाच्या कातर, अस्वस्थ स्थितींत कांहीं क्षण निघून गेले.

' पण लवकरच राण्याला चाटून एक गोळी वडाच्या बुंध्यांत घुसली. राणा वडाच्या बुंध्याला टेंकून पारावर बसला होता आणि खालीं जमिनीवर मी बसलों

होतों. राण्यावर झाडलेली गोळी चुकून वडांत घुसली हें लक्षांत येतांच मी जाग्यावरून ताडकन् उठलों आणि राण्याच्या पुढें बसून, माझ्या देहाची मी त्याच्यापुढें ढाल केली. तसें करतांना माझ्या मनांत कोणते विचार आले असावेत तें मला सांगतां येत नाहीं. शिकारीच्या निमित्तानें बहुतेक लष्करी व पोलीस अधिकाऱ्यांशी माझी दाट ओळख असल्यामुळें ते माझ्यावर गोळी घालणार नाहींत ही मला खात्री असावी. कदाचित् राण्याचा जीव वांचवला पाहिजे, मग मी मेलों तरी हरकत नाहीं ह्या एकाच भावनेनें मी तें धाडस केलें असेल.

'ज्या बाजूनें पहिली गोळी आली त्या बाजूला कांहीं बंडवाल्यानीं धांव मारली. त्यांनीं आठ दहा बार काढले. शत्रु लवकरच दिसेनासा झाला.

'रामचंद्र राणा मात्र शांत होता. गोळी दोन बोटें अंतरावर झाडांत रुतली हें त्यानें पाहिलें. पण त्याची मुद्रा बदलली नाहीं, भीतीचा लवलेश तेथें दिसला नाहीं. माझ्याकडे स्नेहार्द्र, कौतुकाच्या नजरेनें पहात त्यानें म्हटलें, —बामना, तूं कित्याक मरतासा ?

'मरणाला तुच्छ लेखणारा पण दुसऱ्यांचे त्रास पाहून कष्टणारा रामचंद्र राणा मला किती तरी थोर दिसला. घराण्याची परंपरा राखण्यासाठीं तो बंडांत सामील झाला होता. बंडाचें आधिपत्य स्वीकारण्याची पवित्र, धार्मिक जबाबदारी आपल्यावर आहे या जाणीवेनें किती तरी थोर मनाचे राणे बंडांत सामील होऊन मरून गेले, त्यांपैकींच रामचंद्र राणा हा एक होता.

'याप्रमाणें एक एक दिवस जात होता. प्रवासांतील दगदगीमुळें, हालअपेष्टांमुळें माझा दुसरा म्हातारा सोबती वाटेंत थोडयाच दिवसांत वारला होता. तिघांपैकीं मी शिल्लक राहिलों होतों. पण त्यांच्याचप्रमाणें मीहि मृत्युलोकींची वाट केव्हां धरीन याचा नेम नव्हता. मला जगांतून नाहींसा करण्यासाठीं विसाजीची बंदूक नेहमींच सज्ज होती. रामचंद्र राण्याची सहानुभूति माझ्या पाठीशीं उभी नसती तर लिलांवाच्या वेळींच माझें मरण ओढवलें असतें.

'आमची टोळी गांवोगांव फिरत असे आणि तिच्याबरोबर मलाहि जावें लागे. लुटालुटींत अर्थातच मला भाग घ्यावा लागत नसे. गांवालगतच्या एखाद्या रानांत मी, रामचंद्र राणा व आणखी एक दोन बंडवाले इतकी मंडळी बसून रहात असूं.

केव्हां केव्हां राणा हल्ल्यांत सामील होई.

‘ या पंधरा वीस दिवसांत मी बहुतेक बंडखोरांना प्रिय होऊन बसलों होतों. मुक्कामाच्या वेळीं मी राण्याच्या शेजारीं बसून निरनिराळ्या विषयांवर तासन् तास बोलत राहीं. त्या वेळीं सगळी मंडळी आमच्या भोंवतीं बसून एकाग्र चित्तानें माझ्या तोंडून निघणारा शब्द न् शब्द ऐकत असे. रामायण, महाभारतांतील रोमांचकारी कथा, इतिहासकालीन निरनिराळ्या युद्धांचीं वर्णनें, वर्तमानकालीन जागतिक घडामोडी, इत्यादिसंबंधीं माझीं व्याख्यानें ते समरस होऊन ऐकत. माझी ही लोकप्रियता विसाजीला असह्य होई. कारण तिच्यामुळें माझ्या शिक्षेचा—म्हणजे माझ्या मृत्यूचा प्रश्न दिवसेंदिवस लांबणीवर पडत होता.

‘ पण जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशी मृत्यूची भीति मला सर्वस्वी सोडून गेली. धामधुमीच्या प्रसंगीं माणसाचें असेंच होते. तो मूळचा भित्रा असला तरी धाडसी बनतो. माझेंही तसेंच झालें. परंतु मृत्यूच्या भीतीनें नव्हे तर घरच्या मंडळीच्या आठवणीनें मला आतां घरीं जावें असें फार फार वाटूं लागलें. संधि साधून मी राण्याला तसा प्रश्न केला. त्याला माझा प्रश्न ऐकून आनंद झाला पण तितकेंच वाईट वाटलेंसें दिसलें. मला वाटत होती तितकी माझी मुक्तता सोपी नव्हती. कारण आमच्या गांवांत आमच्या घराच्या अंगणांत मारल्या गेलेल्या आठ दहा बंडखोरांच्या मृत्यूच्या सूडाच्या हेतूनेंच त्या बंडखोरांनीं मला पकडून आणलें होतें. अशा स्थितींत मला मोकळा करण्यानें त्यांचा स्वाभिमान दुखत होता. सुरेख गोष्टी सांगणारा या दृष्टीनें मी त्यांना हवा होतों. पण त्यांच्या सोबत्यांना मारणारा त्यांचा भयंकर शत्रू या दृष्टीनें माझा मृत्यू त्यांना हवा होता.

‘ शेवटीं एक दिवस त्यांची सभा भरली. विसाजीनें माझी मुक्तता होऊं नये, उलट मला गोळी घालून ठार करावें अशा अर्थाचें भाषण केलें. त्याच्या कांहीं सोबत्यांनीं त्याला पुष्टी दिली.

‘ रामचंद्र राण्यानें आपल्या संथ गंभीर वाणीनें माझी तरफदारी करून माझी मुक्तता करण्यांत यावी असें सांगितलें. मी जातीनें बामण असलों तरी वृत्तीनें वीर आहें आणि बंडखोरांना जवळचा आहें; तेव्हां मला मारणें

उचित होणार नाहीं अशी त्यानें माझ्यातर्फे मखलाशी केली. या दोन भिन्न मतांत तोड काढण्यासाठीं एका म्हाताऱ्यानें असें सुचविलें कीं, प्रायश्चित्त म्हणून त्यांच्या देवतेपुढें हजार रुपये ठेवून मग मी घरीं जावें. राण्याला हें म्हणणें मान्य झालें. व बऱ्याच बंडखोरांनीं त्याला पाठिंबा दिला. विसाजीला ही गोष्ट पसंत पडेना. त्यानें आग्रह धरला कीं जर तुम्हीं देवतेचें नांव पुढें करतां तर कैद्याची वाट कशी लावावी हें तिलाच कौल लावून विचारा. राण्यालाहि या मताविरुद्ध कांहींच बोलतां येईना. त्यानेंहि या म्हणण्याला मान्यता दिली, आणि माझ्या आयुष्याची दोरी देवतेच्या कौलावर–प्रसादावर अवलंबून राहिली.



‘ शेवटीं सत्तरीच्या एका रानवट गांवांत मला नेण्यांत आलें.तेथेंच बंडखोरांचें देऊळ होतें. मला देवळांत नेण्यांत आलें. माझ्याबरोबर रामचंद्र राणा, विसाजी व इतर दहा बारा प्रमुख बंडखोर होते. त्यांपैकीं एका म्हाताऱ्यानें देवतेच्या पाषाणी मूर्तीला प्रसाद लावला. ‘ बंदिवानाला सोडून द्यावें तर डावीकडची कळी दे.’ असें त्यानें मागणें केलें. ते कांहीं क्षण मला कसे वाटले हें मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. सगळी मंडळी तटस्थ होऊन मूर्तीच्या अंगावर लावलेल्या पाकळ्यांकडे अनिमिष नेत्रांनीं पहात होती.

‘ देवतेनें मला अनुकूल कौल दिला. माझी मुक्तता व्हावी, पण देवतेला मी शक्त्यनुसार कांहीं द्यावें असें सर्वानुमतें ठरलें. राण्यानें माझ्या पाठीवर उल्हासानें थाप मारली. विसाजीची चर्या अधिकच भेसूर वाटली.

‘दुसऱ्या दिवशीं मी एका जासुदामार्फत घरीं पत्र लिहिलें. त्यांत, मी लवकरच घरीं परत येईन असें कळवून माझ्या मुक्ततेसाठीं पांचशें व लिलावांत घेतलेल्या बुगडीच्या जोडाचे तीनशें मिळून आठशें रुपये पाठवून देण्याबद्दल आईला लिहिलें.

‘ दोन दिवसांनीं रक्कम माझ्या हातीं पडली. माझ्या मुक्ततेची वेळ ठरविण्यांत आली. सगळे बंडवाले देवळाच्या मंडपांत जमा झाले. माझ्याकडून देण्यांत येणाऱ्या रकमेचा कांहीं हिस्सा प्रत्येकाला मिळणार असल्यामुळें ते आनंदित होते. विसाजीचा चेहरा मात्र भयानक दिसत होता.मी त्याचा केलेला अपमान त्याला जाळीत होता.आणि माझ्या मुक्ततेची वेळ हळुहळू जवळ येत चालली होती, हें पाहून तो चवताळलेल्या

वाघासारखा झाला होता. देवतेच्या अनुकूल प्रसादामुळें सगळे लोक मला अनुकूल झाले होते. कोणत्याच उपायांनीं आतां माझी मुक्तता होण्याचें टळत नव्हतें. विसाजीचा सगळा दुष्टपणा, सगळी शक्ति निष्प्रभ ठरली होती.

'नंतर मी इतर दंडवाल्यांचा निरोप घेऊं लागलों. त्या जमावांत मला विसाजी दिसला नाहीं. हा दुष्ट माझा घात तर करणार नाहीं ना? ही शंका माझ्या मनांत चटकन् येऊन गेली. मी राण्याकडे भितिनिदर्शक नजरेनें पाहिलें. त्यानें निश्चयी स्वरांत म्हटलें,—लाग चालूंक बामना!

'इतकें बोलून राणा तेथून दिसेनासा झाला. वाटाड्या पुढें झाला. मी त्याच्या मागोमाग चालूं लागलों. माझीं पावलें जड पडूं लागलीं. मी आसपास पाहूं लागलों.

'पंधरा मिनिटांची वाट चालून झाल्यानंतर आम्हांला एक वळण लागलें. तेथें झाडी दाट झाली होती. आणि वाट फार अडचणीची होती. मी वळणावर पोंचलों असेन नसेन. झाडींत 'काड काड' असा बंदुकीचा चाप ओढल्याचा आवाज माझ्या कानांवर आला. मी तेथेंच थांबलों आणि चटकन् पाहिलें. माझ्यावर बंदूक रोखून धरलेली विसाजीची भयानक मूर्ति मला दिसली, अन् 'राणे! राणे!' असा निर्वाणीचा उद्गार माझ्या तोंडून निघाला

'एक क्षण गेला असेल नसेल, झाडींत बंदुकीचा बार झाला आणि विसाजी बंदुकीसकट जमिनीवर आदळला.

'वेगवेगळ्या भावनांनीं मी मूढ होऊन गेलों. स्वप्नसृष्टीत एकादा अद्भूत चमत्कार पाहिल्यासारखें मला वाटलें.

'मी तेथेंच निश्चल होतों. माझा वाटाड्या माझ्याप्रमाणेंच हतबुद्ध झाला होता.

'इतक्यांत, झाडींतून कांहीं अंतरावर मला रामचंद्र राण्याची उदात्त, उंच मूर्ति येतांना दिसली. मी धांवत जाऊन त्याचे पाय धरले. त्यानें मला उठवून म्हटलें,—आतां हेंसर रवंक नाका, चलूंक लाग. देवता तुझ्या पाठीशीं आसा.

'आणि त्यांच्याकडे वळून पहात पहात मी घरची वाट धरली.'

राण्याची कहाणी
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# ओझरती झळ

श्री. बा. भ. बोरकर.

रोजच्या यांत्रिक जीवनक्रमाला कंटाळलेला माझा जीव स्वैरतेचा अनुभव घ्यायला आसावला होता. शनिवारची ही रात्र मजेंत घालवावी या हेतूनें मी लगबगीनें धक्क्यावर आलों व पांचाची फेरीबोट गांठली. मला म्हापशाला माझ्या मित्राकडे जायचें होतें.

बोट सुटायला अजून चारपांच मिनिटें अवकाश होता. माझ्या किरकिऱ्या वृत्तीला तेवढाहि वेळ पुष्कळ वाटला. मी आसपास नजर फिरविली. आसमंत अगदीं प्रसन्न होता. हिरव्या पिवळ्या टेंकड्यांवर दमलेलें ऊन विसावलें होतें. मंद निळसर पाणभुईवरून शुभ्र शिडांच्या नटव्या होड्यांची ये जा चालू होती. आम्हांला घेऊन ती फेरीबोट झुलक्या घेत होती. बाहेर पाण्यांत निष्काळजीपणानें चाळा करण्यांत मोठी गंमत वाटत होती. सलगीच्या व हुशार अशा समवयस्क तरुणांशी गप्पागोष्टी करण्यांत जी एक गोड जादू असते तिचा मी अनुभव घेत होतों.

बोट सुटायची घंटा झाली त्यावेळीं मी भानावर आलों. एवढा वेळ माझ्यावर दोन जनानी डोळे घाईघाईनें स्वतःला सांवरून घेत आहेत असें मला वाटलें. स्पर्शाबरोबर गोगलगाईचें सर्वांग संकोच पावतें तसें झालें. फोटोसाठीं बसतांना नवशिक्या माणसाला जो एक आंखडलेपणा वाटतो व त्यामुळें जी एक कृत्रिमता त्याच्या बैठकींत येते, तशी माझ्याहि वागणुकींत आल्याचें मला जाणवलें. तिच्या डोळ्यांत कांहींसा खोडकरपणा होता, व तो त्यावेळीं मला विशेषच भासला. तिच्या खालच्या ओंठावर किंचित् मिस्किल स्मित घोंटाळत होतें. तिच्या त्या ओंठांतली सदोषताच फार आकर्षक होती. लटक्या रुसव्याचे वेळीं सामान्यपणें

कोणतीहि स्त्री विशेष सुंदर नाहीं का दिसत ?

ती मुलगी किरिस्तांव होती. तिचा वेष मोठा मनोवेधक होता. कोटारारखें निळ्या कॉलरचें दुग्धवर्ण पोलकें व त्याखालीं गडद निळ्या रंगाचा गुडघा—छाट घागरा अशा पार्श्वभूमीवर फुलपांखरांप्रमाणें भुरभुरणारे तिचे डोळे, सर्व कांही आकर्षक होतें. ती फारशी सुंदर नव्हती किंवा गोरीही पण नव्हती. परंतु मोकळ्या हवेंत वाढलेलें टवटवीत फूल जसें रसरसणाऱ्या जीवनामुळें आकर्षक व प्रेरक वाटतें तशी ती दिसत होती. अबोलशा साळुंकीनें अवघ्या अंगानें बोलावें तशी ती बोलूं लागली, अन् मला वाटलें आपण फार जुने स्नेही आहों.

बोट द्रुतगतीनें चालली होती, व वृत्तीच्या यौवनसुलभ चंचलतेला एक प्रकारची स्वैरता आलेली होती. तिच्या नजरेला नजर देण्याचें टाळण्यासाठीं मी इतर प्रवासी मंडळीकडे पाहिलें. एक नवविवाहित हिंदु दांपत्य जवळच बसलें होतें. नवरीच्या मुद्रेवर कैद्याची दीनता होती, तर नवरदेव असा दिसत होता कीं सगळ्या जगानें याला देणें आहे व कुणीहि त्याची फेड करीत नाहीं. सनातनी व अस्पृश्य यांच्यांत जेवढें अंतर असतें तेवढेंच त्यांच्यांतहि होतें. पण तीं नवरा—बायको होतीं. हिंदु होतीं.

तिचा चेहरा मला ओळखीचा वाटला. तिनेंही मला ओळखलें असावें. जराशानें मला आठवलें, तीं माझी शाळासोबतीण होती. बरींच वर्षें आम्ही एकमेकांना पाहिलेंहि नव्हतें. तिच्या डोळ्यांत मधला काळ समजून घेण्याची उत्सुकता दिसली, व मी आतां बोलावयास सुरवात करणार असें दिसतांच ती अनोळखी चेहरा करून गप्प बसली. मी चमकलों. पण समजलोंहि. हाडामांसाचा आश्रय केलेल्या त्या दुबळ्या जीवाला पाहून मला कींव आली. गरीब बिचारी !

बेतींत पोंचतांच कावळ्यांच्या भिऱ्याप्रमाणें शोफरांनीं आम्हांला जीव नकोसा केला. आम्ही सगळे एकाच बसमध्यें चढूं लागलों. त्यावेळीं ड्रायव्हर त्या ख्रिश्चन मुलीला म्हणाला,—इथं फ्रंट सीटवर या ना तुम्ही !

—नको. इथं बरी आहें मी.—आंत बसतां बसतां ती म्हणाली.

—आंबे भरल्यासारखे भरतात बाई माणसांना !—माझ्याकडे पहात अर्धवट आपल्याशींच ती म्हणाली.

—या थंडीच्या दिवसांत सोगीच्या दृष्टीनें एकंदरींत बरं असतं.—मी उत्तरलों.

जराशी भुंवई उडवून ती हंसली. माझ्या हातांतल्या पुस्तकाकडे पहात तिनें विचारलें.—तुम्ही काय इंग्रजी शिकतां ?

—छे. मी शिकवतों आणि शिकतोंहि तसं म्हटलं तर !

—पण अगदीं पोरसवदा दिसतां कीं तुम्ही ?

—उडया मारायची मला लहानपणापासून संवय आहे.

—लागलं बिगल नाहींना कधीं ?

—मध्यें माझा चित्तवेध करणारं सांपडलं नाहीं मला कुणी अजून !

—अस्सं !—कांहींसं वेडावल्यासारखं करून तिनें म्हटलें.

—ती वही कसली आहे ?—विषय बदलण्यासाठीं मी विचारलें.

—कोंकणी गाणीं आहेत तीं.

—कसलीं ? मांडे+ का ?

—हो. पण तें तुम्हांला कसं कळलं ?

—त्यांत काय एवढं ? तरुणींच्या हातांत उन्मादक मांडेच असायचे !

—चोराचीं पावलं चोरालाच उमगतात म्हणे !

मी बाहेर पाहिलें व हंसत म्हटलें,—बाहेर काळोख पडूं पहात आहे. पुढं राज्य चोरांचंच आहे. पण जाऊं द्या. मला मांडे बघूं देत तर खरं.

तीं गाणीं रोमन लिपींत लिहिलीं होतीं व खालीं पाश्चात्य नोटेशन होतें. मी हलक्या आवाजांत गाऊं लागलों.

**पावस पॉड्डा, वारॉ येता मुचे मांच दोर्या गॉजेंता**
**दोर्या-वेळर बोसुन आंव लारां मेजीतां ***

वल्लभाची अधीरतेनें वाट पाहाणाऱ्या आतुर दयितेची ताणलेली मनोवृत्ति

---

+ गोमंतकांतील ख्रिश्चन लोकांच्या कोंकणी भाषेंत लिहिलेल्या प्रेमगीतांना ‘ मांडे ’ म्हणतात.

* पाऊस पडतो आहे, वारा वाहातो आहे, समुद्र गर्जना करीत आहे, अन् समुद्रकिनारीं वेळेवर बसून मी लाटा मोजतें आहें.

त्यांत सुंदर रीतीनें उमटलेली होती. माझे सूर मला कमी वाटूं लागले. तिला काय वाटलें कुणास ठाऊक. ती मला साथ करूं लागली. “ **पावस पोट्टा...**”

बस जोरांत चालली होती. गार वारा झणझणत होता नुसता, व माझे केंस माझ्याच गालांवर चिमचिमत होते. आंत एक प्रकारचा उबारा होता, व संभाषणामुळें एक प्रकारची मादकता वृत्तीला बेफामपणा आणीत होती. ही वेळ जितकी गोड असते तितकीच दुष्ट असते. अशा वेळीं प्रणय–विद्धांना शल्य अधिक जाचतें व आजाऱ्यांना क्लेश जास्त होत असतात.

चटकन् मोटार थांबली. झडणारा चौघडा अकस्मात् थांबावा तसें मला झालें. परस्परांशीं आम्ही किंचित् जोरानें हस्तांदोलन केलें. त्या प्रसन्नतेंतही मला खिन्न वाटलें. ती हंसत हंसत दृष्टीआड झाली. एक दोनदां तिनें वळून माझ्याकडे पाहिलें व मी हॅट उडवीत तिला निरोप देत राहिलों.

मंद पावलांनीं मी जाऊं लागलों. रस्त्याच्या एका बाजूस ती हिंदु मुलगी अडखळत अडखळत नवऱ्याच्या मागून अंतराअंतरानें मान खालीं घालून जात होती.

मित्राच्या घरांत पाऊल टाकतों तोंच तो म्हणाला,—काय सूत्रधारासारखा गातच प्रवेश केलास कीं तूं!

आतां कुठें माझ्या लक्ष्यांत आलें कीं मी गात होतों.

“ **पावस पॉट्टा वारॉ येता मुजे दोर्या गॉजेंता—**”

ओझरती झळ
बा. भ. बोरकर.

# पापाचें प्रायश्चित्त !

डॉ. अ. जि. सरदेसाई.

चालतां चालतां मध्येंच थांबून सुमन म्हणाला,—इथं काय लग्न वगैरे आहे कीं काय ?

— लग्न ! अन् ह्या महिन्यांत !—सुशील आश्चर्यानें म्हणाला,—ब्रह्मदेव अक्कल वांटीत होता तेव्हां कुठं गेलां होतां रे तुम्ही सारे लघुकथालेखक ?

— कां ?

— एँ ! उगाच ! पौष महिन्यांत लग्नं लागतात वाटतं !

— लागत नाहींत ? खरं कीं काय ?

— लागणं सोडच, लग्नासंबंधीं वाटाघाटी – नव्हे ‘ लग्न ’ हा शब्द सुद्धां तोंडांतून येतां कामा नये ह्या महिन्यांत. शाळेंत मास्तर ‘ ल ’ हें मुळाक्षरसुद्धां शिकवीत नाहींत मुलांना बायकांच्या या शून्य महिन्यांत !

— चल, वात्रट कुठला !—सुमन हंसत हंसत म्हणाला.

— अरे खरंच. खोटं वाटलं तुला ?

— ठाऊक आहे मला.—सुमन औपरोधिकपणें म्हणाला.

— तुला ठाऊक आहे माती ! आतांच विचारीत होतास लग्न आहे कीं काय म्हणून. स्वतःच्या चालीरितींचा अभ्यास नाहीं, निरीक्षण नाहीं, आणि लघुकथा लिहितोय म्हणे !

थोडयाशा अंतरावर असलेल्या घराच्या अंगणांत मांडव उभारला होता. आणि तिन्ही बाजूंनीं झांवळ्यांनीं वेष्टिलेल्या मांडवांतून शेकडों लोक बोलत असल्याचा आवाज येत होता.—विहिणी बोलत असल्याचा भास होतो आंत !—सुमन हंसत हंसत म्हणाला.

मांडवाकडून एक दुक्कल येत होती. त्यांतील एकाला सुमननें विचारलें,

— काय हो, काय चाललं आहे आंत ?

उत्तर देण्याचें सोडून दोघांकडेहि निरखून पहात त्या गृहस्थानेंच उलट प्रश्न टाकला,—तुम्ही कुठले अंत्रुजचे ?

— छे !—सुशील म्हणाला,—आम्ही मडगांवचे. कां ?

— ह्यः, ह्यः, एरवींच.—तो गृहस्थ गोंधळून म्हणाला,—तुम्हांला पुष्कळदां कुठं तरी फोंडें–धवळीला पाहिल्यासारखं वाटतं. राघोबा, एऽ राघोबा ! थांब, मी आलों.—दोनच हात पुढें सरलेल्या आपल्या सोबत्याच्या नांवानें हांका मारीत तो पसार झाला. जरासा पुढें गेल्यावर तो गृहस्थ राघोबाला म्हणाला,—एँ ! जपानी !—आणि दोघेही खो खो करून हंसूं लागले.

सुशील म्हणाला,—पाहिलंस ! आम्हांला जपानी म्हणतो आहे तो. तूं आधीं त्याला विचारायलाच नको होतं. चालेना कांहींहि तिकडे ! आपल्याला लागत नसलं......

— अन् काय बिघडलं विचारलं म्हणून ? मला तर तो पक्का लफंग्या दिसतो. हेंच पहा ना ! आम्हांला म्हणे ह्यानं पुष्कळदां ढवळीला बघितलं आहे. तूंहि त्या ठिकाणीं पाऊल घातलं नाहींस. आणि मला तर तें नांव ऐकून तेवढं माहीत आहे. अन् हा म्हणतो...मला वाटतं एक तर तो अर्धवट असावा किंवा दारुडा तरी असावा. नाहींतर पाहीनास, दोन हातांवर असलेल्या राघोबाला त्यानं केवढ्या मोठ्यानं हांक मारली ती ! कोणालाही वाटलं असतं, ह्याचा राघोबा दोन कोसांवर आहे. चल, आम्हीच पाहूं या जाऊन काय आहे तें तिथं.— सुशीलला ओढीत सुमन म्हणाला.

— तुम्ही कुठून घांटावरून आलां का ?—सुमनच्या भाषणाचा शेवटचा भाग कानावर पडलेल्या एका गृहस्थानें प्रश्न केला.

— कां ?—सुशीलनें विचारलें.

— ह्यः ! वाटतं मला तसं !—तो गृहस्थ म्हणाला.—ही जत्रा साऱ्या गोमंतकांत जुगाराविषयीं प्रसिद्ध आहे. इतक्या मोठ्या प्रमाणांत जुगार आणखी कुठंही चालत नाहीं. आणि तुम्ही विचारतां, तिकडे काय चाललं आहे म्हणून.

तो गृहस्थ अंधारांत दिसेनासा झाला, आणि दोघांच्याही डोक्यांत प्रकाश पडला. तेवढ्यांत सुमन सुशीलला म्हणाला,— चल.

— कुठें ? जुगाराच्या अड्ड्यांत ?

— हो किती तरी दिवस इच्छा होती माझी जुगारीचा अड्डा पाहण्याची.

— कां ?

— तूं एक मला हाच दिसतोस ! कां म्हणजे ? लेखकाला मिळेल तेवढा अनुभव हवाच असतो. पतित समाजाच्या सूक्ष्म निरीक्षणाशिवाय आम्ही त्याविषयीं परिणामकारक लिखाण कसं लिहूं शकूं ? आधीं चांगल्या रीतीनं अभ्यासून...

— अजून चांगल्या रितीनं अभ्यासण्यासारख्या पुष्कळ चांगल्या गोष्टी जगांत आहेत. त्या अभ्यासू या, आणि—

— सोंवळ्या माणसा, त्या दिवशीं वाचलेलं अलेक्झांडर क्युप्रिन ह्या रशियन लेखकाचं चरित्र आठवत नाहीं तुला ? एवढा मोठा लेखक, पण वेश्यांचं जीवन अभ्यासण्यासाठीं कसा त्यांच्या समाजांत वावरूं लागला ! किंवा असंही म्हणतां येईल, कीं तो त्या समाजांत फिरूं लागला म्हणून एवढा मोठा लेखक झाला, अन् इतकी कीर्ति मिळवूं शकला.

— वाः ! छान मार्ग आहे तर मग हा मोठा लेखक होण्याचा ! एखाद्या संपादकाची मूठ दाबून किंवा अजिजी करून मोठा लेखक होण्यापेक्षां हा मार्ग सरळ नी सोपा आहे. मला वाटतं यापुढं लेखकांनीं...

— पुरे. पुरे कर वात्रटपणा. एका रशियनच कां, मोठमोठ्या फ्रेंच, इंग्लिश लेखकांचीं उदाहरणं मी तुला देऊं शकेन.

— छ्यः, छ्यः, इतकं लांब युरोपांत नको जायला. स्वदेशीचा काळ आहे हा. महाराष्ट्रांतही कांहीं कमी नाहींत उदाहरणं !

— महाराष्ट्रांत आहे काय ? दत्तवाडीला सेवेला राहिल्याप्रमाणं राहायचं, अन् वेश्यांचं ‘ हलकट ’ जीवन रंगवायचं ! देवळाच्या गर्भागारांत तीर्थाचे घुटके घेत दारूच्या प्याल्याचे दुष्परिणाम हृदयद्रावक पद्धतीनं दाखवायचे ! अर्धांगवायु झालेल्या माणसाप्रमाणं चोवीसही तास घरांत गादीवर लोळायचं अन् मध्येंच वायूचा झटका आल्याप्रमाणं शेतकऱ्यांची हलाखीची स्थिति ‘ तन्मयतेनं ’

वर्णन करण्याकरतां लेखणी हातांत धरायची ! असले हे आमचे लेखक ! तें राहूं देच ! पण हेंच पहाना. तूं प्रथम माझी स्वतःच्या चालीरितींचा अभ्यास नाहीं म्हणून हेटाळणी केलीस, दुसऱ्यानं आम्हांला जपानी ठरविलं. तिसऱ्यानं घांटी बनविलं, आणि चौथा मिळेल तो कसा गौरव करील तें सांगवत नाहीं. तीच आम्हांला सगळी माहिती असती तर ! अन् तेंही खरंच. एवढी प्रख्यात जत्रा ! गोव्याबाहेरच्या लोकांना सुद्धां तिची बारीक सारीक माहिती ! आणि आम्ही खुद्द गोव्याचेच असून ह्या जत्रेंतील 'महत्त्वा' च्या गोष्टींची आम्हांला माहिती असूं नये म्हणजे काय ?— आणि शेवटीं सुशील नको नको म्हणत असतां सुमननें त्याला तिकडे ओढलेंच.

एका वेश्येच्या घराच्या—सर्व बाजूंनीं बंद केलेल्या—अंगणांत पडलेल्या त्या जुगाराच्या अड्ड्यांत सर्व धर्मांचे, सर्व जातींचे, सर्व धंद्यांचे लोक दिसत होते. एका संन्याशाकडे बोट दाखवून सुमन म्हणाला,—पाहिलंस, शिकागो येथील सर्वधर्मपरिषद वाटेल ही एखाद्याला....अन् तें पाहा,—विजयश्रीनें माळ घातल्यामुळें आनंदानें उल्लू बनलेला एक मुसलमान आपल्या एका पराक्रमी हिंदु भक्तनिसाच्या गळ्यांत गळा घालीत होता, त्याकडे बोट दाखवीत तो म्हणाला,—हिंदु मुसलमानांचें इतकें प्रेम ताजमहाल बांधणाऱ्या शहाजहानच्या कल्पनेंत सुद्धां आढळून येणार नाहीं !...तो पहा, गळफांस लावून बसलेला गृहस्थ. हा आहे एका सरकारी ऑफिसांत चीफ (Chefe) च्या हुद्यावर. आणि त्याच्या उजव्या हाताला बसलेले दोघेहि त्याच्या हाताखालचे. तसेंच त्या दुसऱ्या माणावर तो दुकानदार अन् त्याचा नोकर कसे मांडीस मांडी लावून बसले आहेत ! काय, आहे कीं नाहीं समता ! फ्रेंच राज्यक्रांतीची घोषणा कुठें अक्षरशः अंमलांत उतरली असेल तर ती ह्या पुण्यभूमींत ! चल, आपण जरा पुढें जाऊं.

— पुरे रे.—सुशील म्हणाला.—जवळ जाऊन आणखी काय पाहाणार ?

सुमन मुकाट्यानें पुढें झाला.

ह्या लघुकथालेखकाला पाहतांच पुष्कळशा प्रतिष्ठितांनीं तोंडें फिरविलीं. सुमन म्हणाला, — आतां मीच त्यांना ओळख देतों.

— जाऊं दे रे. ज्याचं पाप त्याच्यापाशीं. एकादशी करणारा फराळ खाईल.

त्यांनीं जर आम्हांला एवढा मान दिला आहे, तर आम्ही त्यांना कां हिणवावं ?

— एकादशी करणारा फराळ खाईल ? तो खाईल तो खाईलच. त्याला पुण्य तरी मिळतं. पण एकादशी न करतां फराळ खावा लागून करणाऱ्याच्या सहवासांतील माणसांचं अजीर्णानं नुकसान होतं ना ! — इतकें म्हणून त्या गृहस्थांना आजन्म उरेसारखी चांगलीच ओळख सुमननें दाखविली.

परत येतांना एका लंगोटीवाल्यानें म्हटलें,— लवकरशे ? गावलें दिसता बरें !

सारी रात्र जागून सुमननें ' पापाचें प्रायश्चित्त ' नांवाची लघुकथा लिहिली. ' संसर्गीही भोगी न केवळ दोष आपुले भोगी,' ह्या आर्याधीचें अवतरण मथळ्याखालीं देऊन जुगार खेळणाराच तेवढा खलास होत नसून, जुगाऱ्याच्या कुटुंबांतील माणसांचें जिणेंसुद्धां कसें दुःखी होतें तें तींत मार्मिकतेनें वर्णिलें होतें.



तिसऱ्या दिवशीं सुशील व सुमन घरीं येण्यास निघाले. दुपारीं दारांत पाऊल घालतांच पाटावरूनच वडील ओरडले,—चालता हो माझ्या घरांतून. गांवांत तोंड दाखवायला जागा ठेवली नाहींस मला. फातर्फेच्या जत्रेला म्हणून गेलास तो वेश्यांचे उंबरठे...आणि सुशील, चांगले उपकार फेडलेस मामाचे लहानाचा मोठा करून शिकविल्याबद्दल ! त्या दिवशीं नाहींसे झालेले पन्नास रुपये कुठं गेले तें आतां मला समजून आलं. !

उष्टाच हात कपाळावर मारीत सुमनच्या मातोश्री म्हणाल्या,—कसली पोरा अवदशा आठवली तुला ? नांवानं तेवढा सुशील, पण कृतीनं...त्याचा तरी काय अन्याय त्यांत ? सगळी चूक तुमची ! तो जेव्हां नेमानं रात्रौ शिकविण्यासाठीं म्हणून बाहेर जाऊं लागला, तेव्हांच मी म्हटलं होतं, ' पहा हं ! ही चिन्हं कांहीं ठीक दिसत नाहींत. तेव्हां चौकशी करा, कुठं शिकवतो, काय शिकवतो, कोणाला शिकवतो त्याची. पण त्यावेळीं उलट तुम्ही माझ्यावरच डोळे लाल केले चांगल्या मुलाबद्दल निष्कारण भलताच संशय घेते म्हणून. भाचा नव्हे तुमचा तो ! आतां घ्या. तुमच्याच पोराला शिकवलं त्यानं ! उपकार माना आतां त्याचे !

पापाचें प्रायश्चित्त !

डॉ. अ. जि. सरदेसाई

# वि ठू

श्री. **महादेवशास्त्री सी. जोशी.**

दोन वर्षांनंतर आज मला गोमंतकाचें रम्य दर्शन घडत होतें. सासरहून माहेरीं येणाऱ्या मुलीच्या हृदयांत ज्या आनंदोर्मी उसळत असतात नी जी ऊल्हासवृत्ति तिच्या प्रत्येक कृतींत ओसंडत असते, त्याच भावमधुर संवेदनेचा मीहि यावेळीं अनुभव घेत होतों. परदेशीं काळ कंठणाऱ्या इसमाला मातृभूमि म्हणजे माहेरघरच !

केवळ माहेरघरीं येण्यानेच मुलीचें समाधान होत नाहीं; तर जेव्हां ती आपल्या बालमैत्रिणीला भेटून तिच्याशीं कानगोष्टी करील तेव्हांच तिच्या आनंदाची सांगता होते नी सांचलेल्या उत्कंठेचें पारणें फिटतें.

मला तरी माझ्या मित्राच्या गांवीं गेल्याशिवाय कसें चैन पडणार ? उगवत्या सूर्यानें पृथ्वीला नी मी माझ्या मित्राला एकदमच दर्शन दिलें.

- ओहो, हो ! शास्त्रीबुवा ! या तुम्ही पुणेकर मंडळी !—आमचे मित्रवर्य हंसतमुखानें पुढें आले.

वसंतऋतूचे दिवस होते ते. समोर विस्तीर्ण कुळागर पसरलें होतें. वसंत-वाताच्या स्पर्शानें पोफळी डोलत होत्या. पहांटेसच शिंपणें झाल्यामुळें जिकडे तिकडे गार झालें होतें. जागोजाग केळींना घड लटकलेले होते. कुळागराच्या आजूबाजूंनीं अनेक जातीचीं आंब्याचीं कलमें भाराक्रांत झालीं होतीं. एखाद्या वृद्ध आजोबाला त्याचीं लहानमोठीं नातवंडें बिलगावीं तसे अंगणाला लागूनच असलेल्या फणसाच्या वृक्षाला बुंध्यापासून फांद्यांपर्यंत फणस चिकटले होते. पाटाला लागूनच दोन अशोकाचे वृक्ष पुष्पसंभारामुळें तांबडेलाल दिसत होते. मला वाटलें, रंगपंचमीचा रंग मनसोक्त खेळले असावेत हे. एका लहानशा टेकडीच्या पायथ्याशीं माझ्या मित्राचें घर होतें. अन् त्या टेकडीवर यावेळीं काजींनीं

पिवळ्या तांबड्या बोंडूंचें प्रदर्शनच उघडलें होतें. नारिंगीची, लिंबाचीं, पपनसाचीं, पपईचीं वगैरे झाडेंहि आसपास होतींच. परसांत आबोलीची व गुलाबाचीं फुलें उमलली होतीं. जांभाच्या झाडावर जांभ आले होते व सकुटुंब सपरिवार वानरमंडळींची त्याच्यावर बसून यथास्थित मेजवानी चालली होती. अन् माझ्या मित्राचीं मुलें डबे वाजवून त्यांना हांकलून लावण्यासाठीं मोठमोठ्यानें ओरडत होतीं. पाटाच्या कडेने असलेल्या सगळ्या पोफळींवर झुपकेदार पानवेली चढल्या होत्या. अन् हें विलोभनीय वैभव माझ्या मित्राचें होतें. खरा श्रीमंत होता तो !

माझ्या अवचित आगमनाने पराकाष्ठेचा आनंद झाला होता त्याला. व्यावसायिक, खासगी, सार्वजनिक, अशा अनेक विषयांवर आमच्या गप्पांना रंग चढला होता. रसाळ फणसाचे थोडेसे गरे नी मूठभर गरम गरम काजी एवढ्यावरच उदरपूर्ति झाली. पण दोन मित्रांमधलें संभाषण ! कितीहि झालें तरी त्याचा वीट कधींहि येत नाहीं. खांडेकरांनी त्याला चक्रव्यूहाची एका ठिकाणीं दिलेली उपमा किती सार्थ आहे !

आमच्या संभाषणाच्या ऐन रंगांत एक कुळवाडी पडवीवर आला. वर्णानें काळा, मध्यम उंचीचा, मजबूत बांध्याचा, अन् खांद्यावर कांबळ घेतलेला. त्याच्या डोक्याचे नी दाढीचे केंस चांगले बोटभर वाढलेले होते. बहुधा दोन महिने त्यांच्यावरून वस्तरा फिरलेला नसावा. त्याच्या एका हातांत पाळ नांवाचें एक हत्यार नी दुसऱ्या हातांत विडया बांधण्यासाठी कांहीं कुड्याचीं पानें होतीं.

—आलास विठू ?—माझा मित्र त्याला म्हणाला.

विठूनें माझ्याकडे पाहिलें नी माझ्या मित्राला विचारले,— हे खंयचे, दादा ?

—अरे हे आंबेड्याचे शास्त्रीबुवा. तुला माहिती नाहीं ?

—ना, मियां बघूंकच ना केन्नां हेंकां.

—घाटावर असतात ते, पुण्याला.

माझ्या मित्राचा भागेली * होता तो. कांहीं माल आणण्याकरतां माझा

---

* उत्पन्नाचा विशिष्ट हिस्सा घेऊन मालकाचें शेत पिकविणारा किंवा नारळाची बाग राखणारा; भागीदार.

मित्र त्याला आज घाटमाथ्यावर कणकुवीला पाठवणार होता. गूळ, तेल, तंबाकू, मिरच्या, वगैरे माल घरांत आणून ठेवायचा व थोडयाशा नफ्यानें तो शेजाऱ्यांना पुरवायचा, असा जोडधंदा होता आमच्या मित्राचा.

—थांबा हं ! याची जरा रवानगी करतों.—असें मला सांगून तो उठला व मळकटसें एक मोठें पंचपात्र घेऊन बाहेर आला. त्यांत वर थोडासा खुर्दा, कांहीं रुपये व त्याच्याखालीं घडया करून ठेवलेल्या करन्सी नोटा होत्या. त्यांतून दहा दहाच्या पांच नोटा व एक रुपया काढून त्यानें विठूच्या हातावर ठेवला अन् सगळा तपशील सांगून त्याला पाठवून दिलें.

मला थोडेंसें आश्चर्यच वाटलें त्याच्या या कृतीचें. मी म्हटलें,

—नारायणराव, एकदम एकावन रुपये त्याच्या स्वाधीन केलेत तुम्ही. इथून वीस मैलांवर ब्रिटिश हद्दीत जाणार हा, अन्......

—तुम्हांला ठाऊक नाहीं शास्त्रीबुवा, म्हणून तुम्ही अशी शंका प्रदर्शित केलीत. या विठूसारखा इमानी, प्रेमळ अन् धन्याच्या हिताला जपणारा असा माणूस नाहीं आढळायचा. आतांच पहा, मी एक रुपया त्याला जेवणाखाणासाठीं म्हणून दिला आहे ना ? येतांना त्यांतले चार सहा आणे तरी तो गांठीला बांधून आणील नी मला म्हणेल,—दादा, हे घ्या तुमचे पैसे. मला दहा आणेच पुरले.

—अरे वाः ! अगदीं धर्मराजाचाच अवतार आहे म्हणायचा !—मी म्हटलें.

—मोहोरांच्या राशीवर बसवा त्याला. भूक लागली तर पोटाला दोर बांधील पण एका तसूला हात नाहीं लावायचा !—नारायणराव मधेंच क्षणभर थांबले नी पुनः बोलूं लागले.

—काय सांगूं तुम्हांला ? हा माझा विठू ! एका आपत्प्रसंगांत पंढरीच्या विठोबासारखा पावला तो मला. नारायणरावांनीं ती गोष्ट सांगायला प्रारंभ केला.



पांच वर्षांपूर्वीचा प्रसंग. भूतकालीं भोगलेल्या दुःखांच्या स्मृती वर्तमानकालीं सुखावह होतात असें कोणी म्हणतात. पण तो प्रसंग आठवला कीं अजून कांटा उभा राहातो माझ्या अंगावर !

गांवांत एक विलक्षण सांथ आली. पटकीसारखें पण तिच्याहिपेक्षां भयंकर

स्वरूप होतें तिचें. रक्ताचे रेच होऊन माणसें दगावत. गांवांत कहर उठला.

दुर्दैवानें माझी पत्नी व तीनहि मुलें त्या भीषण महामारीच्या तडाख्यांत सांपडलीं. खेडेगांवांत कुठले डॉक्टर–वैद्य ? झाडपाल्याचीं औषधें कोणी सांगतील तीं आणून पाजायचीं. या रोगानें पछाडलेला रोगी तडकाफडकी मरत नसे. चांगला आठ दिवस तडफडून मग मरायचा. त्यामुळें निदान औषधपाणीं तरी करायला अवसर सांपडे.

पोर्तुगीज सरकारला ही बातमी कळायला वेळ लागला नाहीं. आमचें सरकार असल्या सांथीच्या रोगांना फार भितें.

ताबडतोब सरकारी डॉक्टर व अधिकाऱ्यांचा मोर्चा आमच्या गांवाकडे वळला. गांवाची एकदम नाकेबंदी झाली. परगांवचा माणूस गांवांत येऊं द्यायचा नाहीं नी गांवांतला माणूस बाहेर सोडायचा नाहीं.

गांवाबाहेर एका उजाड मैदानावर कांहीं झोंपड्या तयार केल्या. प्रत्येक घरीं शिरायचें अन् रोगी दिसला कीं त्याला उचलून त्या माळावरच्या झोंपडींत आणून ठेवायचें असा सपाटा सुरू झाला. अर्थात् आम्हीहि त्यांत सांपडलोंच.

—'अमुक गोष्ट झाली हें दुःखांत सुख' असें पुष्कळ लोक म्हणतात. पण आमच्या वांट्याला आलें तें मात्र दुःखांतलें परमदुःख ! माझ्या पत्नीला एका झोंपडींत, थोरल्या मुलाला दुसऱ्या झोंपडींत, अन् धाकट्या दोन मुलांना तिसऱ्या झोंपडींत, अशीं सगळीं माणसें अलग अलग ठेवण्यांत आलीं.

त्या जागीं शिद्दी शिपायांचा सक्त पहारा ठेवला होता. कोणालाहि त्या झोंपड्यांच्या आवारांत ते येऊं देत नसत. एखाद्याला क्षेमसमाचार घ्यायचा असला तर तो बाहेर घ्यावा अन् निघून जावें. सकाळ–संध्याकाळ डॉक्टर रोग्यांना इंजेक्शनें करीत नी तासातासानें औषधाचा डोस पाजीत.

डॉक्टर फार सज्जन गृहस्थ होते. रोग्यांच्या—अन् त्यांतूनहि लहान मुलांच्या वेदना अन् विव्हळणें पाहून त्यांच्या दयाशील अंतःकरणांत कालवाकालव होई. त्यांचें औषध कडू असेल. पण शब्द मात्र अमृततुल्य नी सहानुभूतीनें ओथंबलेला असे.

झोंपड्यांत येऊन आठ दिवस झाले तरी कोणाच्याच प्रकृतींत सुधारणा

नव्हती. उलट आमच्या धाकट्या मुलाचें जरा जास्तच होतें. चार रोगी नी सुश्रूषक मी एकटा. एक मातीचें मडकें भरून सकाळीं पेज शिजवून ठेवायची अन् कोणी ' पाणी ' म्हटलें कीं घोटभर त्याला पाजायची. त्या पांच सहा दिवसांत जे माझे हाल झाले ते कट्टया शत्रूलाहि भोगावे लागूं नयेत.

गांवांत माझे कितीतरी स्नेही होते. कित्येक नात्या–गोत्याचीं माणसेंहि होतीं. पण एकानेंहि मला मदत केली नाहीं. नुसती विचारपूस करायलासुद्धां कोणी फिरकलें नाहीं तिकडे. संसर्गजन्य रोग ना हा? प्रत्येकाला माझ्यापेक्षां आपल्या जिवाची जास्त भीति वाटे.

माझें भारावलेलें हृदय त्यावेळीं मदतीपेक्षांहि कळकळीच्या एका शब्दासाठीं तळमळत होतें. तेवढीच मी माझ्या स्नेहीमंडळीकडून अपेक्षा करीत होतों.

दिवस कसातरी निघून जाई. पण रात्र? एखाद्या कृत्येसारखी ती अनंत मुखांनीं ग्रास करायला उठे. भीतीनें काळीज करपून जात असे माझें.

ती झोंपडी! झोंपडी कसली ती? वर आकाश अन् खालीं आम्ही यांच्यामध्यें कांहींतरी व्यवधान होतें म्हणूनच तिला झोंपडी म्हणायचें. दोन मेढी उभ्या करून त्यांवर चार दिंडयांचे नी कुडयांचे टाळे टाकलेले होते. दुसऱ्याच दिवशीं त्यांचीं पानें सुकून नी करपून गेलीं. अशा त्या रुग्णालयांत दिवसा उन्हाच्या रखरखाटानें रोग्याच्या अंगाची काहिली होई. रात्रभर थंडी कडाडे अन् वरून अखंड दंववृष्टि!

ऐन मध्यरात्रीची वेळ होती. अंधार मिट्ट पडला होता. झोंपडीसमोर शेकोटी धडाडत होती. पलीकडच्या रानांत कोल्हे ' कुई ' घालीत होते अन् भालू रडत होत्या. त्यांचे शब्द त्या भीषण शांततेंत स्पष्ट ऐकूं येत होते. जवळच एक सातवणीचा मोठा वृक्ष होता. त्यावर घुबडाची स्वारी आपल्या विकाळ घूत्कारानें त्या शिवारुतांना साथ करीत होती. मला त्यावेळीं गोविंदाग्रजांच्या ' घुबडास ' या काव्याची आठवण झाली——

' ऐकुनि वाटे तव हें गाणें
निजल्या विश्वाचेंच घोरणें
वाऱ्याचें बेछूट बरळणें
किंवा काळोखाचें रडणें लागत काय तरंगूं...घुबडा बोलरे घू घू.'

आपल्या इकडे घुबडाला यमाचा दूत म्हणतात त्याची सत्यता यावेळीं मला पटली. त्या काळ्या रात्रीचा भयाणपणा वाढवायला घुबडाचा तो एकच शब्द पुरेसा होता. मधून मधून आसपासच्या झोंपड्यांतून रोग्यांच्या आरोळ्या नी किंकाळ्या कानावर आदळत होत्या. घणाच्या घावासारखा काळजावर प्रहार होत असे त्यांचा. रेच व्हायच्या वेळीं पोटांत मुरडा होत असे नी आंतडीं न् आंतडीं पिळवटून निघत त्यांचीं. ओरडतील नाहींतर काय करतील बिचारे ?

त्याच वेळीं माझ्या धाकट्या मुलाला ग्लानि आली. घटकोघटकीं ते प्राणघातक रेच होतच होते. कशीबशी चार चमचे पेज पाजून मी त्याला मांडीवर घेऊन बसलों होतों. साऱ्या गात्रांना विलक्षण क्षीणता आली होती त्याच्या. मी त्याला हृदयाशीं कवटाळीत होतों अन् दारुण मृत्यु माझ्या वत्सल मिठींतून त्या चिमण्या जीवाला हिसकावून नेऊं पहात होता.

त्याच्या क्षीण आणि निस्तेज मुखाकडे साऱ्या शरीराचे डोळे करून मी पहात बसलों होतों. मृत्यु ! मृत्यूच्या कल्पनेनेंच माझें हृदय कंप पावलें. हृदयाच्या त्या दुर्निवार धडधडीनें माझे देहबंध तटातट तुटून जातील कीं काय असें वाटूं लागलें. माझा अंतरात्मा खोल कुठें तरी अंधकाराच्या विवरांत दडपला जातो कीं काय अशी धास्ती वाटली. डोळ्यांतून आसवें ओघळूं लागलीं. यावेळीं मला कोणीतरी सोबत करील का ? या आशेनें मी चोहोंकडे पाहिलें. पण घोर रात्रीशिवाय कोणीहि नव्हतें तिथें. मी अशा अशरण परिस्थितींत हताश होऊन बसलों असतां झोंपडीच्या दारांत दबलेल्या स्वरांत मला कोणी तरी हांक मारली.—दादा !

मी एकदम चमकलों. मिणमिणत्या दिव्याच्या प्रकाशांत विठूची मूर्ति दिसली मला.—विठू, तूं आलास ? अन् इतक्या रात्रीं?—विठूच्या आगमनानें कल्पनातीत आनंद झाला मला. अन् धीरहि आला थोडासा.

—सकाळीं आलों होतों दादा मी. पण शिपायानं आंत येऊं दिलं नाहीं. गोपाळ जास्त आजारी आहे ही बातमी मात्र समजली. लगेच घरीं गेलों, कसंबसं कुळागराला* शिंपणं घातलं अन् गेलों एका घाड्या×कडे. त्याला सांगितलं, काय

---

* पोफळींची बाग. × भुतांखेतांविषयींचें मंत्र–तंत्र जाणणारा मांत्रिक.

वाटेल तें कर, पण माझ्या धन्याच्या मुलाला बरं कर. ही विभूत दिली आहे त्यानं. ही घ्या अन् लावा त्याच्या कपाळाला. थोडी जिभेवरहि घाला.--रुमालांत खोंचून ठेवलेली एक पुडी त्यानें माझ्या हातीं दिली.

ती राख कितीहि किंमतीची असो, पण एका आत्मीयतेच्या संवेदनेनें त्यानें एवढी खटपट केली ती आत्मीयता मात्र खास बिनमोल होती. विठू माणूस नव्हे; देवासारखा वाटला मला त्यावेळीं.

--पण एवढी रात्र कशी झाली तुला ?—मी विचारलें.

—मी लवकरच येणार होतों. पण म्हटलं, शिपाई आंत येऊं देणार नाहीं मला. तेव्हां रात्र करूनच जावं असं मी ठरवलं. पण काय सांगू तुम्हांला दादा ! मी अगदीं हळू चोरासारखा येत होतों. पण पहारेकरी शिद्दी जागाच होता. त्यानं एकदम येऊन मला पकडलं. अन् .. अन्... पोर्तुगीज भाषेंत कांहीं तरी बोलून माझ्या कानशिलावर एक जोरांत चपराक लगावली त्यानं. डोळयांपुढें काजवे चमकले माझ्या. मला बाहेर ढकलूं लागला तो ! मी त्याला दादा मामा करून पाहिलं पण त्याची भाषा मला समजेना. आतां म्हटलं काय करावं ? विचारांतच पडलों जरासा. शेवटीं युक्ती सुचली. माझ्या रुमालाच्या गांठीला आठ आणे होते. हळूच सोडले नी ठेवले त्याच्या हातावर. मुकाट्यानें तो जागेवर जाऊन बसला अन् मी आंत आलों.

—विठू, किती रे त्रास घेतलेस माझ्यासाठीं !—मी काकुळतीच्या स्वरानें म्हटलें.

—माझ्या त्रासाचं काय घेऊन बसलांत दादा ! आज सहा दिवस तुम्हांला झोंप नाहीं. तुम्ही निजा आतां जरासे. मी घेऊन बसतों गोपाळाला.

त्याला काय बोलावें नी काय सांगावें तेंच सुचेना मला. तो हळूच पुढें आला आणि 'द्या इकडे त्याला' असें म्हणत अलगद उचलून घेतलें त्यानें मुलाला.

मला एकाएकीं हुंदका आला तो कांहीं केल्या आवरेना. भावनोद्रेकानें मी एकदम त्याच्या गळयाला मिठी मारली. —विठू !!

विठू

महादेवशास्त्री सी. जोशी

# आठवणींचे अवशेष

श्री. जयवंतराव ज. सरदेसाई.

पन्नास पाऊणशें वर्षांमागची गोष्ट ही. आजच्या तरुण गोमंतकांतली नव्हे. आजच्या गोमंतकांत शेंसेस कायद्यानें प्रतिबंध केलेला आहे. स्त्रीपुरुषांस येथें समान हक्क आहेत. तरीपण आजच्या गोमंतकाचे सगळे सद्गुण जुन्या गोमंतकाचे अवशेष आहेत हें विसरून चालायचें नाहीं.



फटूबाब हे एका जुन्या पण वैभवसंपन्न घराण्यांत जन्मलेले होते. त्या कालच्या मानानें त्यांचें शिक्षणही बरेंच झालेलें होतें. संतवाङ्मयाचा त्यांचा अभ्यास दांडगा होता. दररोज ज्ञानेश्वरीचा अध्याय वाचल्याशिवाय या वीस वर्षांत त्यांनीं एकदांही अन्नग्रहण केलें नव्हतें. तरीपण चंद्रावर डाग हें असावयाचेच ! गर्भश्रीमंतांच्या अंगांत नेहमींच वास करणारी रंगेल वृत्तीही त्यांच्यांत भरपूर होती.

काल्या–जत्रांत जाऊन 'फोल्ग'* मारण्याची प्रवृत्ति आजच्या तरुणांत नसली तरी त्या काळच्या श्रीमंतांत विशेष होती. त्यामुळें श्रीमंगेशाची पौर्णिमेची जत्रा, म्हाडदोळची षष्टी, कवळेंची पंचमी, वगैरे उत्सव म्हणजे लक्ष्मीपुत्रांची छोटींशीं संमेलनेंच होतीं. श्रीमंतांनीं एखादें 'अंगवस्त्र' ठेवणें त्याकाळीं आजच्या सारखें दूषणास्पद लेखलें न जातां उलट भूषणास्पदच समजण्याची वहिवाट होती. श्रीमंतांनीं जर एकादी कलावंतीण ठेवायची नाहीं तर मग ठेवायची तरी कुणी ? आणि मग त्या वर्गाची उपजीविका तरी व्हायची कुणाच्या आधारावर ?

---

* फोल्ग=मजा.

असे त्यांचे प्रामाणिक आचार, विचार व समज होते. पण या जगांत अक्षय काय टिकून राहिलें आहे? सारें जगच जर प्रत्यहीं बदलत आहे तर मग आचार, विचार आणि समज यांची महती ती काय?



दुपारची वामकुक्षी आटोपल्यावर फटुबाब पान खाण्याकरितां नेहमींच्या टेबलाकडे वळले, पण तेथें नेहमींप्रमाणें तयार केलेलें पान नव्हतें. आणि असणार कसें? उद्यां शेवंतीची शेंस होती. तिला यायला आज कसं मिळणार?

ते जरा बेचैनच झाले. श्रीमंतीच्या सावलींत वाढलेल्या माणसास मनाविरुद्ध घडलेली अगदीं क्षुल्लक गोष्टसुद्धां बेचैन करायला पुरेशी असते. जणुं काय एखाद्या खिळ्यावांचून अडून बसणारें प्रचंड यंत्रच!

त्यांनीं स्वतःच पान करून खाल्लें व ते गच्चीवरील आरामखुर्चीवर जाऊन पडले. संध्याकाळच्या मधुर व थंड वायुलहरींनीं त्यांच्या मनावरील विमनस्कतेचा पडदा उडवून दिला.

रस्त्यावरून शेवंतीच्या शेंसेचें आमंत्रण वाजत जात होतें. वाजंत्री चांगल्यापैकीं होते आणि सनईवाला तर नांवाजलेला होता. फटुबाबांच्या आवडीची व आपल्या ठेवणींतली भैरवी तो फार गोड तऱ्हेनें वाजवीत होता. त्यांच्या या संगीताच्या आवडीमुळेंच केशर कलावंतिणीवर त्यांची मर्जी बसली होती. परंतु तो इतिहास पुढें येणारच आहे.

फटुबाबांची वृत्ति खुलली पण ती क्षणभरच! अस्पष्ट होत जाणाऱ्या सनईच्या सुरांबरोबर फटुबाबांची आनंदी वृत्तीही विरत चालली होती. वाजंत्री वाटेनें निघून गेले. परंतु फटुबाबांचें समाधानही त्यांनीं हिरावून नेलें. जणूं काय फटुबाबांच्या समाधानाचें साधन त्यांच्याच हातांत होतें.



उद्यां शेवंतीची शेंस!

फटुबाबांस तें पूर्ण माहित होतें, इतकेंच नव्हे तर त्यांच्याच अनुमतीनें शेंसेचा मुहूर्तदिन ठरविण्यांत आलेला होता. मग!

फटुबाबांस विचार करण्याजोगें त्यांत काय होतें?

कुणास ठाऊक ! पण बरिक एवढें खरें कीं ते विचारचक्रांत गुरफटत होते. मनुष्याच्या आयुष्यांत कांहीं क्षण असे येतात कीं, अनपेक्षित घडून आलेल्या क्षुल्लक प्रसंगांनीं त्याच्या मनांत क्रांति घडते.

— शेवंतीची आणि शेंस ?...त्यांना जरा चमत्कारिक वाटलें.

— पण शेंस म्हणजे काय ?

— शेंस म्हणजे शेंस ..याशिवाय दुसरा अर्थ तिला नाहीं. उद्यांपासून शेवंतीला वेश्याव्यवसायाची दीक्षा देण्यांत येणार !

— आणि परवां ?....

— परवां माझी लाडकी मुलगी शेवंती....पण शेवंती माझी मुलगी....!

— कशी होईल ? ती केशरची मुलगी आहे.....पण तिचा पिता मीच नाहीं का ?........

— तर मग परवां माझी मुलगी हजार माणसांस तृप्त करण्याकरतां आपल्या देहाचं दुकान उघडील !

— आणि मग बाजारांतील माल कुणीहि पैसा टाकून विकत घ्यावा अशी तिची स्थिती होईल. कदाचित् हजारों रोगांनीं विखारलेलें तें ओंगळ शरीर....

— छे ! छे !—फटुबाबांना विचारच करवेना. त्यांच्या चक्षूंसमोर शेवंतीचा विद्रूप चेहरा दिसूं लागला.

विचारांचा विसर पाडण्याकरतां ते येरझारा घालूं लागले. पण आठवणींनीं त्यांना किती तरी वर्षे मागें नेलें.



पहिली पत्नी निवर्तल्यावर फटुबाब दुसऱ्या लग्नाच्या भानगडींत पडलेच नाहींत. वय एरवीं तरुण होतें. परंतु दोन मुलें पदरीं असल्यामुळें त्यांनीं तो विचार केव्हांच मनांत आणला नाहीं. याच विरहावस्थेंतल्या कुठल्याशा वर्षीं ते शिरोड्याच्या जत्रेस गेले होते. संगीताची त्यांना मुळचीच आवड. आणि पुष्कळशा ऐकलेल्या गाण्यांनीं ती वाढीस लागलेली.

कामाक्षीच्या पालखीपुढें केशर गात होती, आणि गात असलेली चीज तर त्यांच्या भारी आवडीची ! केशर कलावंतीण गाणारी चांगली आणि त्या दिवशीं

तिचा गळाही उत्तम लागलेला. फटुबाबांस ती चीज फारच आवडली. त्यांनीं तिला मुद्दाम ती परत म्हणण्यास सांगून देखील पाठविलें. त्यावेळीं केशर अगदीं ज्वानींतील पोर होती.

आणि त्या दिवसापासून फटुबाबांस केशरचें रूप, गुण, स्वभाव, सर्व कांहीं आवडूं लागलें. आणि आपल्या भाटांत त्यांनीं तिला घर बांघून देऊन 'ठेवली.'

केशरहि त्यांच्याशीं आजपर्यंत अत्यंत इमानानें वागली. त्यावेळीं कांहीं कलावंतिणींचीं घरें सुद्धां घरंदाज असत. केवळ पैसा त्यांना भुरळ घालूं शकत नसे. यजमानाकरितां सर्वस्वत्याग करण्याची सुद्धां प्रसंगीं त्या जातीची तयारी असे. परंतु त्या काळाबरोबर तो वेळ निघून गेला आणि आतां त्या रमणीय आठवणींचे अवशेष तेवढे राहिले !

या केशर कलावंतिणीच्या आणि फटुबाबांच्या सहवासाचें मूर्त स्वरूप म्हणजेच शेवंती.

शेवंती अगर केशर जेव्हां फटुबाबांच्या घरीं येत, त्यावेळीं अत्यंत अदबीनें आपली पायरी ओळखूनच त्या वागत असत. केशरची वेषभूषा अगर केशभूषा एकाद्या घरंदाज स्त्रीला शोभण्यासारखी होती; त्यामुळें परवयानें पाहिलें तर त्याला केशर म्हणजे फटुबाबांची बायकोच वाटायची !

अजून फटुबाबांच्या येरझारा बंद झाल्या नव्हत्या, आणि त्यांची विचार-शृंखलाही तुटली नव्हती. शेंसेचें वाजत गेलेले आमंत्रण परत येत होतें. त्या आवाजानें त्यांचे विचार पुन्हां मूळपदावर आले.

— छे ! इतकं जिवाला लावून कोण घेतोय ! —फटुबाब समाधान मानून घेत होते.

— शेवंती म्हणजे माझी कांहीं सख्खी मुलगी नव्हे. माझी मुलगी म्हणजे केंकऱ्यांच्या इथं दिलेली शांता. पोर्तुगालास बॅरिस्टर होण्याकरतां गेलेला माझा मुलगा प्रभाकर....

जरा वेळ त्यांना समाधान वाटल्यासारखें दिसलें.

पण लगेच त्यांच्या मनांत दुसरा विचार आला.

— शांता आणि शेवंती मला सारख्याच नाहींत का? दोघीही माझ्याच मुली ! एक माझ्या पत्नीच्या तर दुसरी केशरच्या पोटीं जन्माला आली....

— पण माझी सीता? ती माझी लग्नाची बायको होती. ती कांहीं केशर-सारखी ठेवलेली नव्हे.

ते आपल्या मनाचें हरतऱ्हेनें समाधान करून घेण्याचा प्रयत्न करीत होते, पण सदसद्विवेकबुद्धि त्यांना सारखी टोंचीतच होती.

— केशर माझी लग्नाची बायको नसली म्हणून काय झालं? माझी पत्नी सीता ज्या इमानानं आणि प्रेमानं माझ्याशीं वागली, तितक्याच निष्ठेनं आणि पावित्र्यानं केशर माझ्याशीं वागली नाहीं का? नुसत्या मंत्रांनीं लग्नाला जास्त पावित्र्य येत नसतं. सीता माझ्याशीं प्रेमानं वागली यांत कांहीं मोठंसं नव्हे. तें तिचं कर्तव्यच होतें. शिवाय तिचे–माझे हितसंबंध एकच. पण केशरची गोष्ट तशी कुठं होती? उद्यां हांकलून दिली तर तिला मुकाट्यानं जावं लागणार हें ठाऊक असून सुद्धां ती माझ्याशीं एकनिष्ठ प्रेमानं वागली, यांतच तिच्या मनाचं थोरपण सिद्ध नाहीं का झालं?

हा दुसरा विचार त्यांना जास्त पटला.

— मग?

— आतां कसं करायचं?

— शेवंती जर माझी मुलगी तर तिची शेंरा घालून तिचा अधःपात मी माझ्याच हातानं करूं? मी माझ्या मुलीस व्यभिचारदीक्षा देऊं?

— छे! छे!!

— मला जशा माझ्या प्रभा आणि शांता तशीच शेवंतीही.

— मग आतां उपाय?

त्यांना कांहींच सुचेना. रात्रीचें जेवण कसेंबसें उरकून त्यांनीं अंथरुणावर तर अंग टाकलें. पण अंथरुण म्हणजे कांहीं विचार–विकारांचा विसर पाडणारें स्थान नव्हे. तसें व्हायला झोंपच हवी.

त्या दिवशीं किती तरी रात्रपर्यंत ते अंथरुणांत तळमळत होते. सुंदर शिसवी पलंग, वर गुडघाभर परांची गादी, काश्मिरी शालीचें पांघरुण, आणि मजेदार

थंडीचे दिवस, यांतील कांहींच त्यांना समाधान देत नव्हते. शेवटीं त्यांनीं एक विचार निश्चित केला, तेव्हांच त्यांना कुठें स्वस्थ झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं उठल्याबरोबर त्यांनीं केशरला निरोप पाठविला.

" शेवंतीची शेंस घालायची नाहीं ! "

नऊ वाजेपर्यंत फटुबाबांना कांहीं धीर धरवला नाहीं. पांच मिनिटें आधींच ते आपल्या पिढीजाद वकिलाच्या घरीं गेले. थंडीचे दिवस असल्यामुळें तो म्हातारा नुकताच कुठें उठला होता. त्यानें धडपडत कपडे बदलले आणि फटुबाबांस आणून दिवाणखान्यांत बसवून घेतलें. फटुबाबांसारखीं चारच अशिलें म्हणजे त्याची वर्षाची बेगमी होती.

धंदेवाईकाच्या अगत्यानें त्यांनीं फटुबाबांची विचारपूस चालवली.

—हें बघा दोतोर, मला आज आणि आतां माझ्या इष्टेटीच्या वांटण्या करायच्या आहेत.—फटुबाबांनींच भाषणास सुरवात केली.

—पण सिंजोर फटुबाब, इतकी गडबडशी ?

—अहो पिकलं पान केव्हां पडेल याचा नेम नाहीं. मनाजोगतं देखल्या डोळां झालं म्हणजे आपलं बरं.—मघांचा उतावळेपणा स्मिताच्या आवरणाखालीं दडवीत फटुबाब म्हणाले.

—तुमच्या वांटण्या त्या काय करायच्या ? प्रभाकरबाबांना देणार ना सारी इस्टेट ? कीं शांताताईंना ठेवणार कांहीं हिस्सा ? इन मीन दोन मुलं; त्यांत वांटणी ती काय करायची ?—म्हातारा हंसत हंसत म्हणाला.

फटुबाबांनीं टेबलावरचा कागदाचा ताव हातीं घेतला व त्यावर कांहीं लिहून वकिलाच्या हातीं दिला.

—आँ !—म्हाताऱ्यानें तोंड वासलें.

—माझ्या इस्टेटीचा अर्धा भाग मी माझी मुलगी शेवंती इला देत असून राहिलेली अर्धी प्रभाकर व शांता यांना समभाग वांटून देत आहें.—म्हाताऱ्यानें कागद वाचला.

—सिंजोर फटुबाब, हें काय करतां तुम्ही ?—तो वकील म्हणत होता.

—दोतोर !—फटुबाब म्हणाले.—उद्यां माझा प्रभाकर पोर्तुगालहून जुवीज

देलेगादचा हुद्दा घेऊन येईल; त्याला माझ्या संपत्तीची पर्वा नाहीं. माझी शांता माझ्यापेक्षांही थोरामोठ्या श्रीमंताच्या घरीं पडलेली आहे, तिला माझ्या इस्टेटीचा अभिलाष नाहीं. आतां राहतां राहिली माझी शेवंती; तिला मात्र आपला पिढीजाद धंदा चालवावा लागेल. पोटाची आग मारण्याकरितां शीलावर निखारे ठेवावे लागतील, आणि त्याच्या अंगारानं माझीच नव्हे तर माझ्या पूर्वजांची पुण्याईसुद्धां जळून खाक होईल. सगळा विचार मी केला आहे; फक्त आतां रजिस्ट्रारकडे जाऊन तुम्ही पुढची तजवीज करा आणि सहीच्या वेळीं तेवढं मला बोलवा म्हणजे झालं.

फट्टूबाबांचा आवाज सद्गदित झाला. तरी पण ते बोलतच होते....

— दोतोर ! मला खात्री आहे कीं तिच्या रूपगुणांवर आणि माझ्या—म्हणजे आतां तिच्या संपत्तीच्या बळावर तिचें लग्न एखाद्या सुविद्य व सुशील तरुणाबरोबर मी लावूं शकेन. तरी बरं देवानंच मला बुद्धि दिली. नाहीं तर उद्यां माझ्या शेवंतीची शॅम होती. उद्यां शेवंती पतित होणार होती. ... आणि...आणि

फट्टूबाबांच्या डोळ्यांतून अश्रू ओघळले, आणि त्यांतच त्यांना बोलून दाखवितां न येणारे प्रेमाचे बोल सांठविलेले होते !

कुळागर

आठवणींचे अवशेष
जयवंतराव सरदेसाई

# चंद्रपूरचा नंदी

श्री. काशिनाथ पुं. घोडे.

घांटावरून येणारी आगगाडी स्टेशनवर उभी राहिलेली पाहतांच मी कोटटोपी आणण्यास आंत गेलों. गाडी निघून गेल्यावर फिरायला जायचें हें आमचें नेहमीचें ठरलेलें. मी कपडे करून मागें पाहतों तों फिरावयास जाणारा माझा खिस्ती मित्र दारांत उभा !

— सिन्जोर कामत, जाऊं या ना फिरायला ?

— हो ! हो ! जाऊं कीं. पण आज नेहमींच्या सडकेच्या शेजारी नको अं. कुठं तरी दूर जाऊं दुसरीकडे.— मी दारांत येत म्हणालों.

— मग कुठं जाऊं म्हणतां ?

— आपण आज तो नंदी पहायला जाऊं.—रस्त्यावर पोंचल्यावर मी म्हटलें. मॉंतीवर असलेली झाडी रस्त्यावरून मला मोह घालीत होती.

— आपण दोघेही इथं नवीन; पण मला इथल्या पुष्कळ गोष्टी ठाऊक आहेत. वर्षाला एक फेरी असतेच कीं माझी ! दर्याच्या उष्ण हवेपेक्षां असली साधारण गरम हवा मला अधिक मानवते.

— हरकत नाहीं. मनाला आनंद होऊन थोडं नवीन मिळालं म्हणजे झालं.

मुख्य रस्त्याला आल्यावर दोन रस्त्यांना जुळविणारा लहानसा पूल ओलांडून आम्ही दुसऱ्या रस्त्याला आलों.

— बराच लांब असेल तुमचा तो नंदी, नाहीं ?—मी कांहींतरी बोलावें म्हणून म्हणालों.

— फार दूर नाहीं तो. या शेतांतून गेल्यास आपण पलीकडच्या भाटांत पोंचूं. तिथून जवळच आहे तो नंदी. तुम्ही कोटांत कधीं पोंचलां नाहीं का ?

— किल्ला आहे का तिकडे ?

— हो तर. पूर्वी म्हणे तिकडे मुईकोट किल्ला होता.

आम्ही शेतांत उतरलों. शेतांत काम करण्याची आमची जुनी पद्धत व पाश्चात्यांची सुधारलेली पद्धत, हाच आमच्या बोलण्याचा आतां विषय झाला.

ह्याच विषयावर बोलत बोलत आम्ही मॉंतीच्या बरेच जवळ पोंचलों. थोडीशी झाडी माजली होती, आणि त्यांतच अस्पष्ट असा उंच पांढरा नंदी आपलें अर्धवट अस्तित्व दाखवीत होता.

नंदीला पाहून आम्हां दोघांनाहि वाईट वाटलें. देवाच्या समोर कलेचा साज म्हणून मिरवणारा नंदी आज अशरण स्थितींत पडलेला होता. धार्मिक छलाच्या दिवसांत देवालयाचा पहारा करतां करतां पाठीवर बसलेल्या कुऱ्हाडीच्या घावांमुळें त्याचें शरीर छिन्नविच्छिन्न झालें होतें. पांढरक्या पुरुषभर उंचीच्या नंदीवरून गाभाऱ्यांतील देवाची कल्पना करतां येत होती. नंदीला पहाण्यासाठीं कित्येक लोक येऊन गेले असावेत, असें मळलेल्या पाऊलवाटेवरून वाटत होतें.

नंदीच्या समोर देवालयाचे अवशेष होते. आज भिंती अशा मुळींच दिसत नाहींत; परंतु मातींत बुजलेल्या हातभर उंचीच्या भिंतीच्या अवशेषांवरून त्या वेळच्या देवालयाची कल्पना सहज करतां येते. व त्यावरून तें एक सौंदर्यपूर्ण देवालय असावें असें वाटूं लागतें. देवळाच्या गाभाऱ्याच्या मध्यभागीं जवळ जवळ एक पुरुषभर खोल खळगा होता. नंदी आणि इतर जें कांहीं पाहायला मिळत होतें तें फादर हेरासनीं उकरून काढल्यामुळें दिसत होतें. माझ्या खिस्ती मित्रानें मला त्याची थोडीशी माहिती दिली. पण ती सुद्धां फार अर्धवट होती.

जवळच एक कुळवाडी लांकडें तोडीत होता. कांहींतरी अधिक माहिती मिळेल म्हणून मी त्याच्याजवळ गेलों. मला जवळ आलेला पहातांच तोहि थांबला. तेथें आलेल्या प्रवाशांना माहिती पुरविण्यास त्याला आनंद वाटत असावा असें त्याच्या चेहऱ्यावरून वाटलें.

— फादर हेरासनीं इथं येऊन काय केलं रे ?— मी विचारलें.

— पाद्री म्हणतां ? त्यानं सगळं उकरून नंदी आणि देव काढले.

— पण असे देव किती मिळाले ?

— असतील चार विसा ! मांडून ठेवले होते कीं इथंच !

— पाद्रीला ते इथंच आहेत म्हणून कसं कळलं रे ?

— ती एक कथाच आहे साहेब. इथं पूर्वीं राज्य होतं असं आमचे वडील सांगत. ही समोर विहीर दिसते आहेना, त्यांत राणीनं जीव दिला म्हणतात. आणि पावसांत येथें सोन्याचे तुकडेसुद्धां सांपडतात.

कुळवाड्याला ती कथा ठाऊक असल्याचें मला दिसून आलें. त्याचा घरीं जाण्याचा वेळ झाल्यानें जमिनीवर उभी केलेली कुऱ्हाड खांद्यावर टाकून तो आमच्याजवळ आला.

— तूं आम्हांला भुईकोटच्या सीमा दाखवशील का ?

तो तयार झाला आणि आम्ही त्याच्या मागोमाग जाऊं लागलों. त्यानें दाखविलेल्या खुणा फारच अस्पष्ट दिसत होत्या. आज त्या गोष्टीला कित्येक वर्षे झाल्यानें सपाट जमिनीला पुष्कळ ठिकाणीं उंचसखलपणा प्राप्त झाला होता; आणि त्यामुळें याच त्या भुईकोटाच्या सीमा असें खात्रीनें सांगतां येत नव्हतें.

फिरत फिरत आम्ही विहिरीजवळ आलों. राणीनें जीव दिलेली ती हीच विहीर होती. देवालयाच्या उजव्या हाताला असलेली विहीर आज पडक्या स्वरूपांत होती. जवळ एकसुद्धां दगड नव्हता. आंत पसरलेला काळोख आणि सभोंवार माजलेली दाट झाडी त्या स्थानाला ऐतिहासिक महत्त्व देत होती.

नंदीच्या समोर असलेल्या दगडांवर आम्ही येऊन बसल्यावर तोहि आमच्या-पुढें येऊन बसला. समोर असलेल्या एवढ्या मोठ्या नंदीसारखा नंदी आम्ही आजपर्यंत कोठेंच पाहिला नव्हता. नंदीचें सर्वच शरीर घाटदार होतें, आणि त्याला त्याच्या गळ्यांतील घंटांची माळ तर सुंदरच दिसे. मी नंदीकडे पहात म्हणालों,

— तुला त्या राणीची गोष्ट ठाऊक आहे कारे ? तिनें कां जीव दिला ?

— तुमच्या पुस्तकांत नाहीं का ती गोष्ट ?

मला इतिहास वाचण्याचा नाद होता, पण राणीनें जीव दिल्याची कथा मला त्यांत कोठेंच सांपडली नव्हती. शिवाय आमचा सुसंगत असा इतिहास तरी कोठें आहे !

— नाहीं. तुला ती ठाऊक असेल, नाहीं ? मग सांग कीं ! जुन्या अन्

त्याही दंतकथा आजच्या नव्या पुस्तकांत थोडयाच मिळतात वाचायला !

तो सरळ बसला. घोंगडीवर उभी केलेली कुऱ्हाड त्यानें आडवी ठेवली; आणि लंगोटीच्या टोंकानें त्यानें आपला चेहरा पुसून घेतला. त्याचें उघडें पडलेलें शरीर आमच्या कपडयांनीं लपेटलेल्या शरीराला हंसत असल्याचें वाटत होतें. त्यानें सांगण्याला सुरुवात केली.

' आमचे वाडील सांगत कीं, विहिरींत जीव दिलेली राणी शेवटच्या राजाची बायको होती. येथें आज जी वस्ती आहे ती अगदीं अलिकडची; लोक इकडे वस्ती करण्याला फार भीत असत. राजा आणि राणीचीं भुतें इकडे फिरत असें म्हणतात.

' आणि कां फिरूं नये त्यांनीं ? त्यांचें प्रजेवर तसेंच प्रेम होतें. लहानसें राज्य, पण अगदीं रामराज्य. हिंदु–मुसलमानांची तालिकोट येथें लढाई झाली आणि त्यानंतर आम्हांला वाईट दिवस आले म्हणतात. गोवा बेट परत मुसलमानांनीं घेऊन फोंडयाला पुन्हां त्यांची धर्मजागृति सुरू झाली. हिंदु लोकांना पुन्हां 'पवित्र' करण्याची त्यांनीं तयारी केली.

' एक दिवस असेंच झालें. राणी शीलवती नेहमीप्रमाणें देवाच्या पूजेला आली. बरोबर चारपांच मैत्रिणी होत्या आणि त्या सर्व आनंदानें हास्यविनोद करीत होत्या. देवालयाला लागून सुंदर बाग होती. राजघराण्यांतील सर्व मंडळीला बागेची फार हौस असल्यानें तिची उत्तम प्रकारें निगा राखण्यांत येत होती. पूजा आटोपल्यावर त्या सर्वजणी बागेंत येऊन बसल्या. वर आकाश आणि खालीं जमीन याशिवाय त्यांचें बोलणें ऐकण्याला तेथें कोणी नसल्यानें, त्यांच्या हास्य-विनोदाला फार ऊत आला होता.

' इतक्यांत कोणीतरी कुजबुजत असल्याचें ऐकूं आलें. सर्वजणी उठल्या.

' दोन मुसलमान मुल्ला त्या स्त्रियांकडे बोट दाखवून बोलत होते. आणि विशेषतः राणीच्या सौंदर्यासंबंधीं बोलत असल्याचा त्यांना संशय आला.

'— काय पाहिजे तुम्हांला ? एका धीट मुलीनें विचारलें.

'— आम्ही परमेश्वराचे सेवक ! आणि त्याच्या यात्रेसाठीं निघालेलों प्रवासी आहोंत. वाटेंत विश्रांतीसाठीं, इथं थांबलों इतकेंच !

'— चालते व्हा इथून. तुम्हाला ठाऊक नाहीं का कीं हें देवालय आहे म्हणून ? विश्रांतीचीं स्थानं शहरा बाहेर असतात. माहित नाहीं तुम्हांला ?

'— छे! उगीच तुम्ही आम्हांला त्रास देतां. तुमच्यासारख्या आमच्या धर्मांतील पऱ्या आम्हांला किती मान देतात म्हणून सांगू ?

' त्यांना बरेंच बोलावयाचें होतें, पण सर्वांनीं गोंगाट आणि दगडांचा वर्षाव केल्यानें पळून जाण्याशिवाय त्यांना दुसरा उपाय नव्हता.

त्या दिवशीं सर्व शहरांत या गोष्टीची चर्चा झाली. मुसलमानांचा आपल्यावर डोळा असल्याचें ज्याला त्याला वाटूं लागलें.

आणि त्यांतूनच एक नवीन संकट आल्यानें त्यानंतर सर्व राज्यच्या राज्य नाहींसें झालें.



' जयदेव महाराजांना राजकारणाच्या विचारविनिमयासाठीं शहांचें आमंत्रण आलें. आणि आपलें लहान राज्य सतत टिकवून ठेवण्याची आवश्यकता असल्यानें त्यांना तें स्वीकारणें प्राप्त होतें. महाराज मित्र म्हणून त्यांच्या दरबारीं हजर झाले.

' पण त्यांच्या भेटींतील पहिल्याच प्रसंगानें त्यांचा भ्रम उतरला. त्यांच्यावर ओढवलेलें संकट भयंकर स्वरुपाचें होतें.

'—तुम्हांला सुंदर स्त्री असल्याचें ऐकतों. खरं ना ?— शहांनीं आपल्या मैत्रीचें स्वरूप उघडें केलें.

'—स्त्रिया निसर्गतःच सुंदर असतात. आपल्या कन्या सुद्धां सुंदर असतील! — राजानें त्याला निराळें स्वरूप दिलें.

'— आम्हांला तुमच्या राणीला पहाण्याची फार इच्छा आहे.

' शहांची इच्छा पर्यायानें निराळी होती. ' आम्ही तुमच्यापेक्षां मोठे राजे असल्यानें तुमची राणी आम्हांला पाहिजे आहे.' असाच त्याचा अर्थ होता.

'— हिंदु लोक परक्यांना आपल्या स्त्रिया दाखवीत नसतात.

'—पण आमची तशी इच्छा आहे.

'— आपली मैत्री यावरच अवलंबून आहे काय ?

'— ह्याशिवाय आम्हांला पुष्कळ गोष्टी हव्या आहेत. मला तुमची पत्नी

नुसती पहायची नसून तिच्याशीं निका लावायचा आहे. तुम्ही कांहीं दिवसापूर्वी आमच्या दोन मुल्लांचा जो अपमान केला, त्याबद्दल तुम्ही आमचा धर्म स्वीकारला पाहिजे.

'— आणि इतकं न केलं तर ?

'— मग आम्ही स्वस्थ कसे बसूं ? तुम्हांला कैद करून तुमच्या प्रजेला आमचा धर्म स्वीकारायला लावूं !

'— मला विचार करायला थोडीशी मुदत मिळेल का ?

'— चार दिवसांची मुदत मी तुम्हांला देत आहे.

' शहा गेल्यावर महाराजांना नजरकैदेंत ठेवण्यांत आलें.



' जयदेवमहाराज गेल्यापासून राणीच्या मनांत अनेक विचार येत. आणि ते सर्व तिला भयानक वाटत. मुसलमानांचा त्यांच्या राज्यावर डोळा होता. आणि आतां तर त्यांच्या दृष्टीनें एक बरेंच मोठें कारण सांपडलें होतें. सर्वांपेक्षां आपल्या पुत्रवत् मानलेल्या प्रजेवर येणाऱ्या संकटाबद्दल तिला अधिक वाईट वाटत होतें.

' तिला पूर्ण ठाऊक होतें कीं, शहाच्या शक्तीपुढें आपला उपाय नसल्यानें जयदेवमहाराज शहाकडे मैत्रीचें नातें जोडीत. लहानशा राजाला गरुडासारखी भरारी मारण्याचें सामर्थ्य नसतें. आज तिच्या नजरेंत दिसत असलेला टापू उद्यां दुसऱ्याचा होणार, असें महाराजांच्या विलंबावरून तिला वाटत होतें.

' इतक्यांत शहाकडून एक मुसलमान हेर आल्याचें तिला समजलें.

' — बोलाव त्याला आंत.— राणी दुःखानें बोलली.

' दाढी आणि मुसलमानी पोषाखांत लपेटलेल्या माणसाकडे पाहण्याचें राणीला धैर्य नव्हतें. तो काय सांगणार होता, हें ती पूर्वींच समजून होती.

' हेरानें आपली दाढी आणि पोशाख काढून टाकला. त्यानें राणीच्या पायांना स्पर्श करून मुजरा केला.

' राणीनें त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें—विश्वास, राज्याचे धनी खुशाल ना ?

' त्यानें उत्तर देण्याच्या ऐवजीं मान खालीं घातली आणि लपवून आणलेला लखोटा राणीच्या जवळ ठेवला. तोच राजांचा शेवटचा संदेश असल्याचें त्याच्या

मुद्रेवरून दिसत होतें.

' "…. धर्मांतराच्या पातकाला आपली जनता कधींच कबूल नसल्यानें, तूं त्यांना देशांतर करण्याची विनंति कर. धर्मासाठींच मी सुद्धां प्राणार्पण करणार आहें. आपल्या धार्मिक वस्तूंची विटंबना मांडूं देऊं नकोस. आपल्या राज्यांत पाय ठेवतांना शत्रूला कसलाच अत्याचार करायला मिळूं नये, म्हणजे मी आनंदानें प्राण सोडीन. हें दोन दिवसांत व्हावें अशी इच्छा आहे…."

' राजानें कोणत्या स्थितींत पत्र लिहिलें आहे हें तिला समजल्यावांचून राहिलें नाहीं. विश्वासला घेऊन ती तशीच आंत गेली. राणीच्या शब्दासाठीं प्राण देण्यास सर्व जनता तयार होती. पण इतकेंहि करून आपण यशस्वी होऊं अशी राणीला खात्री नसल्यानें, उगीच प्राणांचे बळी देण्यास ती तयार नव्हती.

' दुसऱ्या दिवशीं सर्व तयारी झाली. चंद्रपुरांत वसलेल्या बाजारपेठा आणि त्यामुळें शहराला प्राप्त झालेलें सौंदर्य, लहानलहान इमारतींमुळें त्यांत पडलेली भर, कुंडयांनीं भरलेल्या फुलझाडांच्या ताटव्यांत इवलीशीं पांखरें व मधुकर यांची सतत गर्दी, हें सर्व आज शून्यवत् झालें होतें. माणसांनीं गजबजलेल्या इमारतींना आणि बाजारी पेठांना मृतकळा प्राप्त झाली होती. माणसांची रांग लागत असलेले रस्ते आज अशुभ दिसत होते.

' राणीच्या अंतःकरणांत दुःखाचा सागर उसळला होता; पण ती कर्तव्य करण्याच्या तयारीस लागली होती. राणी महादेवाच्या देवालयाजवळ आली. तिच्या डोळ्यांत अश्रू जमूं लागले. तिनें ते हळूच टिपून घेतले.

'— राणीसाहेब, आपल्या हातानें लावून वाढविलेल्या झाडाला आपणावरच कापण्याचा प्रसंग यावा, यासारखं दुसरं दुर्भाग्य कोणतं ?—पंडितजी कांहींतरी बोलायचें म्हणून बोलले.

'— पंडितजी, ह्यांतच माणसाला कर्तव्यपालनाचं खरं समाधान मिळतं. आमच्यावर ओढवलेला प्रसंग आपणाला ठाऊक आहे ना ? राजाज्ञेप्रमाणें न वागल्यास परके येऊन त्यांची नासधूस करतील. मग हें पहाणें त्याच्याहून कठीण.

'— राणी सरकार, आपल्या धीराची कमाल आहे. सर्व लोकांनीं जातांना जो आपल्यावर विश्वास टाकला तो याचसाठीं.

'— मग आपलं कर्तव्य करायला नको का ? देवालयासारखं पवित्र स्थानसुद्धां आतां गाडून टाकण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं.

' राणी आणि तिच्यामागून पंडितजी देवालयांत आले. देवासंबंधीं आजपर्यंत असलेल्या मंगल आणि पवित्र भावनेची तिनें पर्वा केली नाहीं. मूर्तीला स्पर्श करतांना सोवळ्याची असलेली गरज आज राहिली नव्हती. मुख्य शिवलिंग आणि इतर लहान लहान मूर्ती गाभाऱ्यांत खोल पुरण्यांत आल्या. राजाची आणि देवाची संपत्ति सभामंडपाच्या मध्यभागीं एकत्र करण्यांत येऊन, जात्यासारख्या दगडी यंत्रावर भरडण्यांत आली.

' राणीनें सर्व सुवर्ण व रत्नकण ओच्यांत घेतले. तिच्या मागोमाग तिच्या सर्व सर्व विश्वासू दासी आणि पंडितजी होते. भुईकोटाच्या सीमांवर प्रदक्षिणा घालतांना ती ओच्यांतील संपत्ति सभोंवार फेंकीत होती.'

' राणी पुन्हां देवालयाच्या दारीं आली. देवालयाच्या अंगणांत असलेला नंदी अजून राज्याचें वैभव सांगत होता. राणीनें त्याला नमस्कार केला व ती उजव्या बाजूला असलेल्या विहिरीजवळ आली. एका हातांत तिच्या प्रिय पोपटाचा पिंजरा होता व दुसऱ्या हातानें ती आपल्या लोकांना निरोप देत होती.

' राणीनें पोपटासह विहिरींत उडी घेतल्याचें पाहिल्यावर तिच्या दासीनीहि तसेंच केलें.

' शहाच्या नजरकैदेंत असलेल्या जयदेव महाराजांनीं हिऱ्याची आंगठी चावून प्राणत्याग केल्याचें व चंद्रपूरचा विनाश झाला असल्याचें समजल्याबरोबर शहाला फार वाईट वाटलें. कोणत्याहि प्रकारें त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं.

कुळवाड्याची गोष्ट ऐकून, मी ती जागा पुन्हां लक्ष्यपूर्वक पाहिली. कुळवाड्याच्या कथेंतील गोष्टी त्या स्थानाला पुष्कळच जुळत होत्या. धर्मासाठी पूर्वजांनीं केलेल्या अपूर्व त्यागाची कथा नंदी अजून सांगत होता. मी प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवला. घरीं परतण्याच्या वेळीं मी कितीदां तरी वळून नंदीकडे पाहिलें. त्यागाची महति सांगणाऱ्या नंदीला तरी आमच्यापासून दूर करूं नये असें मला पुन्हां पुन्हां वाटूं लागलें.

चंद्रपूरचा नंदी
काशिनाथ पुं. घोडे

कुळागर

# दगडाचा देव

श्री. ह. वि. देसाई

पडव्याचें माऊलींचें देऊळ आणि आसपासचा रम्य निसर्गाचा देखावा यांकडे गोव्यांतील एक सौंदर्यानें नटलेलें स्थळ म्हणून अजूनही अभिमानानें बोट दाखवितां येईल. देवळाच्या उजव्या बाजूला असलेलें माडा–पोफळींचें बन, माडांच्या व पोफळींच्या शेंड्यांत लोंबकळणारीं नारळाचीं व बेडयांचीं हिरवी पिवळी लहान मोठीं फळें, डाव्या बाजूला असलेला निसर्गरम्य डोंगराचा कडा आणि देवळाच्या पटांगणापुढील डोंगरामधून खालीं वाहात आलेला पाण्याचा गुप्त प्रवाह, या निसर्गनिर्मित सौंदर्यामुळें त्या स्थळाला अनुपम शोभा आली होती.

गोमुखीमधून वाहाणाऱ्या झऱ्याच्या प्रवाहाचा आवाज, देवळांतील अधून-मधून होणारा घंटानाद, पांखरांचा किलबिलाट आणि वाऱ्याच्या झोताबरोबर माडांच्या चुडतांचा होणारा सळसळ आवाज ऐकला म्हणजे जणुं काय मिश्र स्वरांनीं आणि वाद्यांनीं नटलेलें पार्श्वसंगीतच आपण ऐकत आहोंत असा भास झाल्याखेरीज राहात नव्हता.

स्वतःच्या रमणीय सौंदर्याविषयीं पूर्णपणें अज्ञानांत असलेल्या सौंदर्यसंपन्न तरुणीप्रमाणेंच तेथील भाविक लोक अज्ञानांत होते. निसर्गाच्या सौंदर्यांतील सौख्य लुटण्याइतकी दिव्य दृष्टि त्यांना प्राप्त झाली नव्हती. देवळांतील देवाच्या मूर्तीत सारा निसर्ग भरला आहे....ब्रह्मांड भरलें आहे असा त्यांचा प्रामाणिक समज होता. देवाच्या प्रसादाची कळी आणि गुरवाचा शब्द यांनींच सृष्टीची घडामोड चालली आहे...माणसांच्या नाडीचेही ठोके पडत आहेत असा त्यांचा विश्वास होता.

कर्तबगार तरुणाच्या डौलानें माड डोलत होते आणि नुकतेंच तारुण्याच्या सीमारेषेवर पदार्पण करणाऱ्या अल्लड तरुणीप्रमाणें पोफळी मुरडत होत्या. एखाद्या

साधूच्या गंभीर वाणीप्रमाणें झऱ्याच्या प्रवाहाचा नाद कानीं पडत होता.

आबा गुरवानें यावेळीं माउलीला प्रसाद लावले होते. आजूबाजूला कांहीं भक्तगण मांडीला उपरणें गुंडाळून खुर्चीच्या आकारासारखा देह करून बसले होते. आबा गुरव आपल्या नेहमीच्या संवयीप्रमानें आख्यायिका सांगत होता आणि मधून मधून आपल्या विनोदी भाषाशैलीनें सर्वांना हंसवीत होता. डोंगराच्या दिशेनें येणाऱ्या गार वाऱ्याच्या झोतानें दुपारच्या वेळींही तिथें संध्यासमयींचा थंडावा आल्यासारखा भासत होता. त्या वाऱ्याच्या प्रवाहाच्या तालावर उपरण्याच्या खुर्चींत कित्येक भगतगण डुलक्याही घेत आणि मधून मधून देवळांतील घंटानादानें दचकून जागे होत.

इतक्यांत मोटारीच्या शिंगाचा आवाज ऐकूं आला. रात्रीच्या शांत समयीं घुमणाऱ्या आवाजाप्रमाणें तो आवाज घुमला. देवळाच्या उजव्या बाजूला असलेल्या रस्त्यांत मोटर येऊन उभी राहिली.

नखशिखांत साहेबी पोषाख केलेला एक गौरवर्ण तरुण मोटरींतून खालीं उतरला आणि देवळाच्या मंडपासमोरील पटांगणांत येऊन उभा राहिला. सौंदर्याच्या दिमाखानें मिरविणाऱ्या स्वरूपवान युवतीलाही मान खालीं घालायला लावणारा त्याचा तो रमणीय चेहेरा पाहून आबा गुरवाच्या नेत्रांत पूर्वस्मृतीनें अश्रू चमकले. त्यानें आपल्या धोतराच्या सोग्यानें ते टिपले.

थोड्याशा साशंक मुद्रेनें आबा गुरव देवळाच्या सभामंडपांत आला. त्यानें त्या तरुणाची विचारपूस करण्यापूर्वीच त्या तरुणानें 'आबा गुरव आपलेंच नांव काय ?' असा प्रश्न केला.

आपणच आबा गुरव असें ज्यावेळीं आबानें सांगितलें त्यावेळीं त्या तरुणाला अपरिमित आनंद झालेला दिसला. त्यानें झटकन् आबा गुरवाच्या पायांवर डोकें ठेवलें आणि नमस्कार केला.

— मी गुलाबचा मुलगा. आईनंच मला आपली भेट घ्यायला सांगितलं. —असे उद्गार ज्यावेळीं त्या तरुणानें काढले त्यावेळीं आनंद आणि दुःख यांच्या मिश्र रेषा आबा गुरवाच्या चेहेऱ्यावर उमटलेल्या दिसल्या. पण आबा गुरव आपल्या भावना दाबत होता...मनावर बसलेल्या कोणत्या तरी भावनांचा पगडा दूर

सारायचा प्रयत्न करीत होता, असें त्याच्या चेहऱ्यावर दिसणारे मनोविकार आणि देहाची होणारी हालचाल यावरून स्पष्ट दिसत होतें.

— चल, आंत ये. देवाला नमस्कार कर. बैस थोडा वेळ इथं. बरंच बोलायचं आहे मला तुझ्याशीं.—आबानें सद्गदित कंठानें उद्गार काढले.

— क्षमा करा. मला आतांच सावंतवाडीला गेलं पाहिजे. मी आपल्या दर्शनाला आलों,...देवीच्या नाही. आपली भेट झाली...मला आनंद झाला... आईलाही समाधान होईल. मला आपला आशीर्वाद द्या.

पुनः त्यानें आबा गुरवाच्या पायावर मस्तक ठेवलें. आबानें उचलून त्याला घट्ट पोटाशीं धरलें आणि दुसऱ्या कुणाला न दिसेल इतक्या चपळाईनें त्याच्या कपाळाचें चुंबन घेतलें !

त्या तरुणानें जड पावलें आणि निःश्वास टाकीत मोटर गांठली. आबानें भारावलेल्या देहानें आणि सद्गदित अंतःकरणानें देवळाचा गाभारा गांठला !

— अलिकडचीं उद्धट पोरं ! देवाला नमस्कार करून गेला असता तर काय बेचाळीस पूर्वज नरकांत गेले असते ?—आपणास नातू कधीं होईल याची प्रसाद लावून देवाकडे चौकशी करायला आलेल्या भक्तानें आपलें प्रामाणिक मत व्यक्त केलें !

— कोण मुलगा हा आबा ?—आपल्या मुलींच्या लग्नाच्या चिंतेंत असलेल्या एका ग्रामस्थानें प्रश्न केला.

त्या तरुणाच्या भेटीनें उचंबळलेल्या आबा गुरवाच्या भावना हीं प्रश्नोत्तरें ऐकून जास्तच प्रक्षुब्ध झाल्या. झंझावातांत सांपडलेल्या वृक्षाप्रमाणें आबाच्या मनाची स्थिति झाली. रडल्याशिवाय दुःख कमी होत नाहीं, त्याचप्रमाणें अंतःकरणांत काहूर माजविणाऱ्या गुप्त गोष्टीचा एकाद्या प्रसंगीं स्फोट केल्याखेरीज अंतःकरणाची तळमळ शान्त होत नाहीं.

— त्या तरुणाचा इतिहास ऐकायचा आहे तुम्हांला ?—आबानें विचारलें.

सर्वांनीं होकारार्थी मान हालवली.

आबानें हकिकत सांगायला सुरवात केली.



‘ तो तरुण इथलाच आहे... ग्रामस्थांच्या वंशाचा आहे

आबा गुरवानें काढलेल्या वरील उद्गारांत राग, निराशा आणि भावनेचा ओलावा स्पष्ट दिसत होता. पण वरील वाक्य ऐकतांच तिथें जमलेल्या एक दोन ग्रामस्थांचे चेहेरे बावरल्यासारखे झाले. आतां आबा गुरव कोणत्या प्रसंगाचें वर्णन करणार याची त्यांना कल्पना आली. तरीही अज्ञान पांघरून ते ऐकूं लागले.

‘ दसऱ्याच्या उत्सवांतली पालखीची रात्र होती ती. गुलाबचं व तिची आई शेवंती हिचं त्या दिवशी संध्याकाळीं कडाक्याचं भांडण झालं. दसऱ्याचा सण म्हणजे त्या गांवांतलीं पापं न् रोग धुवून नेणारी गंगा अशीच शेवंतीची समजूत होती. देवाच्या सेवेसाठीं वाटेल ते देहकष्ट राहून करायची तिची तयारी होती. ग्रामस्थांचा राग अन् देवाचा क्षोभ होऊं नये म्हणून पालखीच्या वेळीं नाचावं न् गावं अशी शेवंतीची इच्छा होती.

‘ पण देवाच्या सेवेच्या नांवाखालीं स्वतःच्या चैनीसाठीं पालखीची निरुपयोगी प्रथा पाडणाऱ्या ग्रामस्थांच्या घोळक्यांत आपण जाऊन नाचावं न् देवाऐवजीं या देवचारांची करमणुक करावी ही कल्पना गुलाबला पटत नव्हती. तिनं कथापुराणं वाचलीं होतीं आणि थोडंबहुत आयुष्य मुंबईसारख्या सुधारलेल्या शहरांत गेल्यामुळें निरनिराळ्या विषयांवरील दरींचर्शी पुस्तकंही तिनं वाचलीं होतीं.

‘ देवाच्या सेवेच्या बुरख्याखालीं दडलेल्या ग्रामस्थांच्या स्वार्थी हेतूंना बळी पडण्याइतकी ती भोळी नव्हती. आपल्यावर बरेच ग्रामस्थ आषक आहेत—देवावरील श्रद्धेपेक्षांही त्यांची आपल्यावर जास्त श्रद्धा आहे याची तिला कल्पना होती.

‘ पालखीच्या वेळीं नाचायचं तिनं साफ नाकारलं. शेवंतीची पायाची तिडीक मस्तकाला पोंचली. गुलाबच्या नृत्याच्या तालानं न् गाण्याच्या लकेरीनं ग्रामस्थांच्या खिशांतलीं झाडून सारीं नाणीं आपल्या ताटांत येऊन पडतील अशी शेवंती सकाळपासून मनांतल्या मनांत मांडे खात होती. पण मुलीच्या हटवादी स्वभावामुळं तिला धक्का बसला. तिनं रागानं गुलाबचा बुचडा धरून तिला घराबाहेर काढली आणि तरुण ग्रामस्थांना नसलं तरी निदान आपल्या जुन्या ओळखीच्या ग्रामस्थांना घटकाभर खूष करीन या आत्मविश्वासानें गुलाबचा पोशाख पेहरून ती बाहेर पडली.

‘ आईनं आपल्या भावना न पाहतां आपला अपमान केला म्हणून गुलाब

थोडी ओशाळली होती तर चव्हाट्यावर गाणं बजावणं करून कलेचा बाजार मांडण्याऱ्या दिव्यांतून आपली सुटका झाली म्हणून मनांतल्या मनांत समाधान मानून घेत होती.

' शेवंती फणफणत आपला नट्टापट्टा करीत असतांनाच गुलाब अंगणांतून निघून गेली. ती तडक समोरऱ्या गोमुखीजवळ आली. विचारातिशयानं भारावलेलं डोकं शान्त करण्यासाठीं तिनं डोक्यावर पाणी शिंपडलं आणि तशीच ती या देवळांत आली. खांबाला टेंकून सभामंडपांतील पायरीवर बसून जणुं काय कांहींच घडलं नाहीं अशा अभिनिवेशानं ती गाणं गुणगुणूं लागली.

' ती आपल्या आनंदसाम्राज्यांत दंग झाली होती. वास्तव जग अन् कल्पनांनीं निर्मिलेलं जग यांमधील अंतर ती विसरली होती. इतक्यांत मागून येऊन एका तरुणानं तिला गच्च पकडलं. ती दचकली. तिची समाधी उतरली. ती घाबरली पण ओरडली नाहीं. परपुरुषाच्या स्पर्शानं तिची देहलता थरारली. पण दुसऱ्याच क्षणीं चवताळलेल्या नागिणीप्रमाणं त्या तरुणाच्या बाहुपाशांतून मोकळी होऊन तिनं रागानं त्या तरुणाच्या नेत्रांना दृष्टि भिडविली.

'— तरीही ' येतेस का माझ्याबरोबर ? ' असं त्या तरुणानं तिला विचारलं.

'— कुठं ? — तिनं रागानं विचारलं.

'— चैन करायला ! — त्या तरुणानं निलाजरेपणानं म्हटलं.

'— आधीं इथून चालते व्हा. नाहीतर...—गुलाब कडाडली.

'— मी इथला ग्रामस्थ आहें...तुझ्या भवितव्याचीं सूत्रं हातीं असणारा ग्रामस्थ आहें. — तो तरुणही आपला सूर चढवून बोलत होता.

'— तुम्ही देवळांतले ग्रामस्थ असा किंवा देवाचे बाप असा. मला त्याची पर्वा नाहीं. माझ्यावर सक्ति करणारावर मी लाथ हाणल्याखेरीज राहायची नाहीं...

' देवळाच्या गाभाऱ्यांतून मी हें दृश्य पहात होतों. वेळ प्रसंग आला तर त्या तरुणाची हड्डी नरम करायचाही बेत योजून मी उभा होतों.

' इतक्यांत पुनः त्या तरुणानं तिचा हात पकडला. तिच्या वक्षस्थलावरील पदर गच्च धरला. देवीची लुगडीं वाळत टाकायची सोवळ्याची काठी घेउन मी बाहेर पडत होतों तोंच देवळाच्या मंडपाच्या बाजूनं धांवत येऊन दुसऱ्या एका तरुणानं

त्या पागल तरुणाच्या कंबरड्यांत लाथ हाणली. तो तरुण खालीं आदळला. त्यानं गुलाबचा धरलेला पदर न सोडल्यामुळं तीही जमिनीवर आदळणार होती पण तिच्या सहाय्यकर्त्या तरुणानं तिचा तोल सांवरला. तिला सांवरण्यासाठीं त्यानं तिला आपल्या बाहुपाशांत घेतली...पण तो भावनाविरहित बाहुपाश होता.

' तरीही तीं दोघें शरमलीं.

' पहिल्या तरुणानं तेथून केव्हांच पोबारा केला होता.

'— मी आपली अत्यंत आभारी आहें.— गुलाबनं कसेबसे शब्द उच्चारले.

'— आभारांचं ओझं मी कधीं बाळगत नाहीं. मी माझं कर्तव्य केलं.

'— बरं आपलं नांव तरी सांगाल ?

'— माझं नांव वसंत. आणि आपलं ?

'— माझं नांव गुलाब. शेवंती नायकिणीची मुलगी मी.

'— म्हणजे यंदा मुंबईच्या कलाप्रदर्शनांत पहिलं बक्षिस मिळालं तें तुमचंच चित्र ना ?

' गुलाबनं होकारार्थी मान हालवली. वसंताला अभिमान आणि आनंद वाटला असं त्याच्या चर्येवरून दिसत होतं.

'— म्हणजे एका मोठ्या माणसाशीं माझी ओळख झाली तर !— वसंत म्हणाला.

'—आणखी माझी देखील !— गुलाब उद्गारली.

' वसंतनं तिला घरीं नेऊन पोंचवलं. त्यांची मैत्री दिवसेंदिवस वाढत गेली. दोघेंही बेफिकीर होतीं...समाजाची पर्वा न करण्याइतकी धीट होतीं. त्यांच्या मैत्रीविषयीं गांवांत बोभाटा झाला. वसंताला घरच्या मंडळींनीं तंबी दिली. शेवंतीनं वरपांगी गुलाबचा उद्धार केला. पण श्रीमंत बापाचा बेटा आपला 'जांवई' होणार या विचारानं ती बेहोष झाली. पालखीच्या दिवशीं नाचायचं गुलाबनं नाकारल्यामुळं तिच्या रागाचा वर चढलेला पारा आतां नॉर्मलवर आला.

' वसंत–गुलाबचा इतिहास तुम्हांला माहित नसला तरी वसंत कोण, कुणाचा मुलगा हें तुम्हांला माहित आहेच. वसंत या गांवचा पहिला मानकरी. या गांवांतील कितीतरी भाविणी वसंताच्या एका शब्दासाठीं तळमळत होत्या. पण

वसंत सर्वस्वी गुलाबच्या कह्यांत गेल्याचं पाहून सर्व भाविणी गुलाबवर दांत-ओठ खात होत्या. सर्व ग्रामस्थ वसंतावर खवळले होते.

' तरीही त्या दोन पोरांनीं आपला निश्चय बदलला नाहीं. तीं दोघेंही बाजारांतून फिरायला जात असत. गप्पा मारीत असत. याच ठिकाणीं अनेक विषयांवरच्या त्यांच्या गप्पा मी ऐकल्या आहेत. त्यांच्या गप्पांत प्रणयी चेष्टा नव्हत्या. तरुण-तरुणी एकत्र आल्यानंतर भावनासागराला येणारी खळबळ दिसत नव्हती. पण त्यांच्या प्रत्येक शब्दांत न् हालचालींत त्यांच्या सालस, सरळ हृदयाची साक्ष पटत होती.

' इथल्या ग्रामस्थांच्या इच्छेप्रमाणं व अपेक्षेप्रमाणं व्हायचं तें झालं. वसंताच्या वडिलांनी त्याला घरांतून हांकलून लावलं. वसंत गडगंज इस्टेटीस पारखा झाला. आजोबानं आपल्या हयातींत वसंताच्या नांवावर केलेल्या एका घरांत तो गुलाबसह राहूं लागला.

' सगळ्या पडवे गांवांत खळबळ उडाली होती. लहानापासून थोरांपर्यंत न् गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वजण केवळ याच प्रकरणांत एकजीव न् एकदिल होऊन वसंताची निंदा-नालस्ती करीत होते. पण वसंत अढळ होता. आपल्या विरुद्ध चाललेल्या गहजबाची जणुं काय आपणास मुळीं कल्पनाच नाहीं इतक्या बेमालुमपणानं आणि बेफिकीरपणानं तो वागत होता. '

आबा गुरवाच्या मनश्चक्षूंपुढें वसंताची ती बाणेदार मूर्ति उभी राहिली. त्यानं केवळ तत्त्वासाठीं अफाट संपत्तीवर मारलेली लाथ आबा गुरवाच्या मनांत वसंताविषयींच्या आदरभावास कारणीभूत झाली होती.

वसंताच्या सुधारलेल्या विचारांचें व स्वार्थत्यागाचें त्यांना त्यावेळीं अपरिमित कौतुक वाटलें होतें. या वेळीं तेच विचार त्यांच्या डोक्यांत चमकले.

इतक्यांत देवीच्या डाव्या भुजाच्या बाजूची पाकळी खालीं पडलेली त्यानें पाहिली.

ज्या गृहस्थानें देवीला प्रसाद लावायला सांगितलें होतें त्याला डावा कौल देवीनें दिला असें ज्यावेळीं आबा गुरवानें सांगितलें त्यावेळीं त्यानें हिरमुसला चेहेरा केला आणि ' देवीची मर्जी ' असें पुटपुटत आपला मार्ग सुधारला.

त्या गृहस्थाची ती दीनवाणी मुद्रा आणि निराशेनें काळवंडलेला चेहेरा पाहून

आबा गुरवाच्या अंतःकरणांत चर्र झालें. किती आशेनें तो गृहस्थ आला होता! पण प्रसादानें त्याची निराशा केली याचें आबा गुरवाला अत्यंत वाईट वाटलें.

त्याचें विचारचक्र चालू झालें. देवाला प्रसाद लावतां लावतां त्याचे काळ्याचे पांढरे केंस झाले होते. त्याच्या कारकीर्दीतच त्या देवीची स्थापना झाली होती. आधीं काळें पाषाण, त्या पाषाणाची मूर्ति बनविण्यासाठीं त्याला शिल्पकारानें दर दिवशीं दिलेलें रूप आणि नंतर त्या मूर्तीला आलेली देवकळा या तिन्ही अवस्था आबा गुरवानें पाहिल्या होत्या. त्यानें आतापर्यंत कितीतरी भक्तगणांना देवीचा कौल मिळवून दिला होता आणि कितीतरी भक्त देवीच्या कौलाच्या अभावीं निराश होऊन गेले होते.

पण देवीचा कौल मिळालेल्या भक्तांचें कल्याण झालें कीं अकल्याण होत आहे असा विचार ज्या वेळीं त्याच्या मनांत आला त्यावेळीं मात्र त्याची गोंधळल्यासारखी स्थिति झाली. एकामागून एक असे अनेक विचार आबा गुरवाच्या डोक्यांत गर्दी करूं लागले. त्याची बावरल्यासारखी स्थिति झाली.

पण 'पुढं वसंताचं काय झालं?' असें तिथें असलेल्या श्रोत्यांनीं विचारल्यामुळें आबा शुद्धीवर आला.

— आणि आबा, तो पळपुटा तरुण कोण हें सांगितलं नाहीं तें!—एकानें पृच्छा केली.

— बाबा, तो बडा माणूस आहे. इथला प्रमुख ग्रामस्थ आहे माझी शेंडी आज त्याच्या हातांत आहे.—असें म्हणून आबा क्षणभर स्तब्ध राहिला. त्यानें मनाशीं आपल्या हकिकतीची जुळवाजुळव केली व गोष्टीला पुन्हां प्रारंभ केला.

'वसंत–गुलाब नवरा–बायकोच्या नात्यानं एकव्रतानं राहात होतीं...सुखानं राहात होतीं. कांहीं कालानं आपल्या वास्तव्यानं त्या उभयतांच्या सौख्यांत भर घालणारा मुलगा त्यांच्या पोटीं आला. वसंतनं आपल्या आजोबाचंच त्याला नांव ठेवलं. चंद्रकलेप्रमाणं तो मुलगा वाढत होता आणि चंद्रकलेप्रमाणंच त्या उभयतांच्या सौख्यांत भर पडत होती. सौंदर्य, बुद्धिमत्ता आणि तेज यांच्या देणगीमुळें तो वसंताचा छोटा अवतार दिसत होता.

'बसकेचा तो शेवटचा दिवस होता. माझ्यासकट दहा पंधरा गुरव रांगेनं

बसून देवाचा अवसर आणायचा प्रयत्न करीत होते.

‘ सर्व मानांचे ग्रामस्थ आपापल्या हक्काच्या सोप्यांवर डौलानें बसले होते.

‘ इतक्यांत गुलाबचा मुलगा येऊन एका मानकरी ग्रामस्थाच्या सोप्यावर बसला. वसंताच्या मांडीला टेंकून बसावं इतक्या सहजपणानं तें अजाण मूल एका ग्रामस्थाच्या मांडीला टेंकून बसलं.

‘ त्या ग्रामस्थाला आपले बेचाळीस पूर्वज नरकांत गेले असं वाटलं. तो रागानं लाल झाला. त्यानं रागानं त्या मुलाच्या बखोटीला धरून सोप्यालगतच्या पायरीवर जोरानं खालीं लोटलं.

‘ मुलाचा तोल गेला. तो गडगडत शेवटच्या पायरीवर येऊन आदळला. सर्वांच्या तोंडचं पाणी पळालं. त्या कोमल मुलाच्या डोक्यांतून रक्ताचे पाट वहात होते. सभामंडपाच्या आंतल्या भागांत बसलेल्या गुलाबनं हें दृश्य पहातांच किंकाळी फोडली. रक्तानं माखलेल्या मुलाला तिनं घट्ट हृदयाशीं धरलं.

‘ गुलाब मुलाला घरीं घेऊन जातांच देवळांत पूर्ववत् शांतता पसरली. सर्वांचं लक्ष आतां देवाच्या अवसराकडे लागलं.

‘ इतक्यांत वसंत तिथं आला. रागामुळं त्याचा गौरवर्ण चेहरा तांबडा लाल झाला होता. कपाळाच्या शिरा ताणल्यामुळं मोजण्याइतक्या स्पष्ट दिसत होत्या. पायरीवरील रक्ताची चिळकांडी दिसतांच तर त्याचा तोल सुटला.

‘— बाळाला सोप्यारून कुणीं खालीं ढकललं ? कुणाचा…नायकिणीचा मुलगा वाटला का तुम्हांला तो ?—वसंतानं जमदग्नी अवतार धारण केला होता.

‘ इतक्यांत शेजारच्या एका मुलानं ज्या ग्रामस्थानं गुलाबच्या मुलाला मारलं होतं त्याच्याकडे बोट दाखविलं. वसंताला तेवढंच हवं होतं. त्यानं सरळ जाऊन त्या गृहस्थाच्या छातीवरचं उपरणं पकडलं. देवळांत गोंधळ सुरू झाला.

‘— नायकिणीच्या पोरासाठीं भांडायला यायला शरम कशी वाटली नाहीं याला ? — एका ग्रामस्थानं वसंतावर टीका केली.

‘— निर्लज्ज ! बेशरम ! घराण्याच्या नांवाला काळं फांसलं !—वसंताच्या एका वारसानं त्याचा उद्धार करायला सुरवात केली.

‘ या टीकेनं तर वसंत जास्तच भडकला. ‘— म्हणे नायकिणीचा पोर !

तुम्ही ज्याला आज झिडकारलंत तो माझा मुलगा आहे....माझ्या हाडांमांसाचा गोळा आहे....पण माझा मुलगा म्हणून मी आज झगडायला आलों नाहीं. त्रयस्थ या नात्यानं तुमची कानउघडणी करायला आलों आहें.— वसंताच्या रागाचा पारा वर चढत होता.

'— कालच्या पोरानं नको आम्हांला बुद्धि शिकवायला !— एका ग्रामस्थानं समोरच्या सोप्यावरून उत्तर दिलं.

'— गुलाब नायकिणीच्या नरकांत लोळत पडणाऱ्याला इथं आम्हांला जाब विचारायचा काय अधिकार ?—एका तरुणानं वसंताला विचारलं.

' आधींच वसंत चवताळला होता. त्यांत वरील कुचेष्टेखोर शब्दांची भर पडली. त्यानं त्या तरुणाचा हात पकडला.

'— काय मी नायकिणीच्या नरकांत लोळतों ? नायकीण न् बायको या शब्दांचा अर्थ तरी कळतो आहे का तुला ? रात्रीं तुझा बाप कुठं लोळत पडला होता, इथं जमलेल्या या तुझ्या ग्रामस्थांपैकीं रात्रीं कोण कुठं होते याची तुला मी यादी देऊं का ? ते पहांटेलाच उठून घरीं येतात म्हणून ते सोंवळे व सज्जन, आणि मी एका नायकिणीच्या मुलीला पत्नी या नात्यानं वागवतों म्हणून मी धर्मभ्रष्ट ! नायकिणींच्या व भाविणींच्या घरांत जेवतां—खातांना तुमचे पूर्वज मेले ! या सोप्यावर मिशीला पीळ देऊन बसलेले तुझे हे भाऊबंद रात्रीं कुठं होते, कुठल्या जातीच्या माशाची आमटी त्यांनीं खाल्ली होती याची तुला नोंद हवी काय ?

' आतां आपलीं सर्व बिंगें बाहेर पडतील अशी ग्रामस्थांना भीति वाटायला लागली. सर्व ग्रामस्थ आपापसांत कुजबुजायला लागले. वसंत देवळांत येतांच त्याचे वडील केव्हांच निघून गेले होते. असा कांहींतरी हमरीतुमरीवरचा प्रसंग येणार अशी त्यांना कल्पना होतीच.

' सर्व ग्रामस्थ भडकले. दोघां—तिघांनीं जाऊन वसंताची मान पकडली. सगळ्यांनीं वसंताला फरफटत ओढीत सभामंडपाच्या बाहेर नेलं. वेताच्या काठ्यांनीं चारचौघांनीं त्याला मार दिला.

' दोन बिछान्यांवर सुमारें आठवडाभर तरी बाप—लेक तळमळत होते. आठ दिवसांनीं गुलाब माझ्याकडे आली. तिचा करुण चेहरा पहातांच मला रडूं कोसळलं.

'— आबा मी तुमचा निरोप घ्यायला आलें आहें.— गुलाबनं बोलायला सुरवात केली.—आम्ही कायमचं पडवं गांव सोडून जातों आहों. जगांत न्याय नाहीं. देवांत देवकळा राहिली नाहीं. या दगडाच्या देवाच्या नांवावर ग्रामस्थांचीं वाटेल तीं कृत्यें चालतात. काय करायचं आम्हांला हें घरदार? वसंतांनीं काल घरही वडिलांच्या ताब्यांत दिलं. घरांतली तरंगाची तसबीरही रागानं फोडून टाकली.

'असं म्हणून गुलाब किती तरी वेळ स्फुंदून स्फुंदून रडत होती.

'आणि दुसऱ्या दिवशीं वसंत—गुलाबनं पडवं गांवचा निरोप घेतला ..

'आजचा तरुण म्हणजे वसंतचा मुलगा...गुलाबचा मुलगा...माझा नातू !' आबा गुरव सद्गदित अंत:करणानें म्हणाला.

तिथें बसलेल्या लोकांना आश्चर्याचा धक्काच बसला ! आबा गुरवानें ब्रह्मचारी व्रतानें आतांपर्यंत आयुष्य घालविलें अशी सर्वांची प्रामाणिक समजूत होती.

'गुलाब माझी मुलगी आहे....गुलाबच्या आईचं माझ्यावर आत्यंतिक प्रेम होतं. पण देवळांतलं माझं स्थान अढळ करण्यासाठीं मला तिचं प्रेम झिडकारावं लागलं. मी जुन्या कल्पांनांना न् रूढीला बळी पडलों....एका मुलीचा बाप असतांना ब्रह्मचारी म्हणून मिरवूं लागलों. सर्वस्वाचा त्याग करून वसंतानं मात्र माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घातलं.'

आबा गुरवाच्या नेत्रांतून गंगायमुनांचा प्रवाह वाहात होता. त्याचा नेहमींचा धीरगंभीर चेहरा करुण दिसत होता.

इतक्यांत देवीला लावलेल्या प्रसादाची त्याला आठवण झाली. बराच वेळ झाल्यामुळें पाकळ्यांचें पाणी सुकून बऱ्याच पाकळ्या देवीच्या अंगावरून गळून पडल्या होत्या. तरीही, 'उजवा झाला आहे प्रसाद !' असें आबा गुरवानें बाहेरच्या गृहस्थाला उत्तर दिलें !

तो गृहस्थ आनंदानें बेहोष होऊन देवळांतून बाहेर पडला.

आबा गुरवानें पुन्हां प्रसाद लावायला सुरवात केली.

दगडाचा देव
ह. वि. देसाई

# यमाच्या न्यायासनापुढें

श्री. व्यंकटेश अ. पै रायकर

"राजा राष्ट्र कृतं पापं राज्ञः पापं पुरोहितः।
भर्ताच स्त्री कृतं पापं **शिष्य पापं गुरुस्थितः**॥"

आज यमाच्या दरबारांतील सारी सभा, पृथ्वीवर मरण पावलेल्या एका पुण्यवान साधूच्या जीवाची मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होती.

पृथ्वीवर मरण पावणाऱ्या मानवांच्या आत्म्यांना यमदूत यमाच्या दरबारांत बिनचूकपणें हजर करीत, मृतात्म्यांच्या पापपुण्याच्या कृत्यांचा चित्रगुप्त पाढा वाची, व यमराज त्यांच्या कृत्यांप्रमाणें त्यांस स्वर्ग नरक किंवा मोक्ष या मार्गी नेण्याची आपल्या दूतांना आज्ञा करी.

इतक्यांत दीप्तिमान अंगाचे दोन यमदूत, मोठ्या अदबीनें दरबारांत शिरले, आणि त्याबरोबर त्यांच्या मध्यभागीं असलेली अंगुष्टमात्र अशी तेजोमूर्ति विलक्षण प्रकाशानें तळपूं लागली. दरबारचे मानकरी आणि त्यांच्या मागें उभे असलेले यमदूत यांनीं स्मितपूर्वक माना लववून नवीन आत्म्याचें स्वागत केलें. सर्वज्ञतेने चमकणारे आपले विशाल नेत्र क्षणभर त्या तेजाच्या ज्योतीवर स्थिर करून, यमराजानें आपल्या समोर मांडलेल्या अमोल आसनावर स्थानापन्न होण्याची त्या आत्म्याला विनंति केली. पारदर्शक नीळ आणि चमकणारीं नक्षत्रें यांच्या सहाय्यानें घडविलेल्या त्या आसनावर ती विभूति स्थिर होतांच तिच्यांतून निघणाऱ्या प्रकाशकिरणांचें त्या आसनांतून परावर्तन होऊन अद्‌भुत रंगांचें जाळें तिच्या भोंवतीं निर्माण झालें.

तो आत्मा स्थानापन्न झालेला पहातांच चित्रगुप्तानें सुवर्णाच्या पानांवर तेजाच्या शाईनें लिहिलेली आपली प्रकाशमान् वही उघडली, समोरच्या सभेकडे नजर

फिरविली व धीरगंभीर मुद्रेनें त्याच्या पुण्यकृत्यांची यादी वाचण्यास सुरवात केली.

चित्रगुप्त व यमराज यांच्या आसनापुढेंच, सुवर्णाच्या पारड्यांचा, मोत्यांची झालर असलेला, वज्रजडित तराजू होता. त्याच्या एका पारड्यांत चित्रगुप्तानें उच्चारलेलीं त्या साधूंचीं पुण्यकृत्यें तेजाच्या लोळाप्रमाणें जमा होत होतीं.

कांहीं वेळानें पारड्यांतील पुण्यसंचय किती तरी मोठा झाला आणि पारडें अतिशय खालीं आलें. सगळ्या पुण्यकृत्यांचा निर्देश करून होतांच पारडें स्थिर झालें. पुण्यसंचय इतका मोठा होता कीं, त्या आत्म्याला मोक्षपद प्राप्त होणार हें निश्चित झाल्यासारखेंच होतें; म्हणून सभेंतील सगळ्या प्रेक्षकांनी टाळ्या वाजवून त्या विभूतीचा जयजयकार केला.

विभूतीचा चेहरा आनंदानें अन् अभिमानानें अधिकच प्रफुल्ल झाला आणि मोक्षपद–लाभाच्या जाणीवेचें समाधान तिच्या नेत्रांत चमकूं लागलें.

जयजयकाराचा आवाज त्या ठिकाणीं दुमदुमत असतांनाच चित्रगुप्त एकदम गंभीर स्वरांत म्हणाला,—थांबा ! याचें पापकृत्य सांगावयाचें अजून राहिलें आहे.

हें ऐकतांच सारी सभा तटस्थ झाली. त्या आत्म्याला मोक्षपदाला नेण्याच्या तयारीनें पुढें सरसावलेले यमदूत जागच्या जागीं थबकले. अचानक अशनिपात झाल्याप्रमाणें त्या आत्म्याची मुद्रा झाली.

चित्रगुप्तानें हलकेंच दुसरें पान उलटलें व एकेक शब्द सावकाशपणें उच्चारीत तो उद्गारला.—धर्माच्या नांवाखालीं व्यभिचार !

इतकें म्हटल्याबरोबर दुसऱ्या पारड्यांत अकस्मात् अंधारापेक्षांही काळें अन् भीषण असें विरल द्रव्य दिसूं लागलें आणि थोड्याच वेळांत त्याचा आकार वाढत गेला, व त्याच्या वजनानें क्षणार्धांत तें पारडें खालीं आदळलें. पुण्याचें पारडें हलकें होऊन वर तरंगूं लागलें.

— काय ? व्यभिचार ?—तो अंगुष्ठमात्र जीव भीतीनें चित्कारला.

— होय.—चित्रगुप्तानें शांतपणें म्हटलें.

— महाराज ! त्या विभूतीच्या तोंडून शब्द निघाले.—सगळें आयुष्य मी परमेश्वरप्राप्तींत वेंचलें, संसार सोडला व हजारों लोकांना परमेश्वरप्राप्तीचा मार्ग

दाखविला. शारीरिकच काय पण मानसिक व्यभिचारहि माझ्या हातून कधीं घडला नाहीं. महाराज ! नोंद करतांना आपली चूक नाहीं ना झाली ?

चित्रगुप्तानें फिरून आपली नजर वहीवरून फिरविली आणि गंभीर स्वरांत म्हटलें,—नाहीं, माझी चूक झाली नाहीं. चित्रगुप्त कधींही चुकत नसतो.

'-- मग हें आश्चर्यच नाहीं का ?---विभूति हताश स्वरांत म्हणाली.

'— नाहीं. त्या पापसंचयाकडे लक्षपूर्वक पहा. तुझ्या नांवावर जमा झालेला व्यभिचार जसा घडला तसा तुला त्यांत दिसून येईल.

विभूतीनें त्या काळ्याकुट्ट ढिगावर आपली नजर स्थिर केली. सिनेमाच्या रुपेरी पडद्यावरून वेगवेगळे देखावे झर झर निघून जावे त्याप्रमाणें त्या कृष्ण-संचयांतून त्या विभूतीच्या आयुष्यांतील एका विशिष्ट प्रसंगाशीं निगडित असलेलीं दृश्यें धांवूं लागलीं.



आज अच्युतानंद महाराजांचा वाढदिवस होता. त्या निमित्ताने महाराजांच्या शेंकडों शिष्य-शिष्यिणी वळवईच्या मठांत एकत्र जमल्या होत्या. सगळीकडे आनंद, उल्हास यांचें साम्राज्य पसरलें होतें.

गुरुमहाराजांच्या नांवानें पदोपदीं होत असलेला जयजयकार, टाळ, पखवाज, पेटी यांच्या संमिश्र संगीत शिष्य-शिष्यिणींच्या सुरेल आवाजांत चाललेलें दिंडी भजन, पुरुष —स्त्री हा भेदभाव न बाळगतां ईश्वरप्राप्तीसाठीं झालेली त्यांची तन्मयता हें सगळें पाहून उच्चासनावर विराजमान झालेल्या अच्युतानंद महाराजांच्या मुखावर एक प्रकारचा अनिर्वचनीय, सात्विक अभिमान विलसत होता.

महाराजांच्या भक्तमंडळींत प्रतिष्ठित, वजनदार व श्रीमंत लोक होते. थोरां मोठ्यांच्या स्त्रिया, कुमारिका नी तरुण विधवाहि होत्या.

त्यांच्या शिष्यवृंदाचा जमाव बराच मोठा होता. व त्यांतल्या एका शिष्यावर महाराजांची भारी कृपा होती. अर्थात पट्टशिष्य म्हणून साधूच्या खालोखाल सारा शिष्यवृंद त्याला मान देई . दिवाकर तीस वर्षांचा तरुण ब्राम्हण होता. आपल्या कौशल्यामुळें व दिखाऊ वर्तनामुळें तो महाराजांच्या कृपेस पात्र झाला होता. तो पक्का व्यवहारी होता. संभाषणाची कला त्याला एवढी उत्तम साधली होती, कीं

ऐकणाराच्या मनावर त्याच्या शब्दजालाची विलक्षण मोहिनी पडे. रामायण, महाभारत इत्यादि धर्मग्रंथांतील अनुरूप प्रसंग, व्यवहारांतील योग्य दाखले, ज्ञानेश्वरी, दासबोध, इत्यादि संतांच्या ग्रंथांतील अर्थपूर्ण ओळी, भगवद्-गीतेंतील संस्कृत श्लोक, इत्यादि गोष्टींचा कौशल्यानें उपयोग करून आपल्या कळकळीच्या आवाजांत डोळ्यांत अश्रू आणून ज्यावेळीं तो कीर्तन करूं लागे त्यावेळीं धार्मिक, श्रध्दाळू बाया रडून रडून डोळे सुजवीत आणि मनांत म्हणत, "धन्य ! धन्य आमचा दिवाकर महाराज !"

आजच्या रामारंभांत तो प्रामुख्यानें वावरत होता. त्याची भिरभिरती सोत्कंठ नजर स्त्री–समाजावर वारंवार फिरत होती. एका गोऱ्यापान, सुंदर अन् तरुण स्त्रीवर आज त्याचें लक्ष गेलें होतें.

पन्नाशी उलटलेल्या बिजवराची ती पत्नी होती. तिच्या वेषभूषेंत भपका नव्हता. रुंद किनारीचें लुगडें व खणाची लांब बाह्यांची चोळी, असा तिचा पोशाख होता. तिच्या चेहऱ्यावर तिचा कमालीचा साधा, सरळ स्वभाव प्रतिबिंबित होत होता. आपल्या नवऱ्याकडून, आपल्या सांसारिक हरएक आवडी भागत नसल्यामुळें तिनें गुरुभक्तीचा आश्रय घेतला होता. मनानें दुबळी; वृत्तीनें साधी-भोळी; घरची गरिबी; अशा स्थितींत असल्या उत्सवाच्या प्रसंगीं जे क्षण जात तेवढेच तिला सुखाचे वाटत.

दिवाकराच्या धूर्त व कावेबाज दृष्टीस हें सावज साधें भोळें असल्याचें केव्हांच कळून चुकलें होतें. तिच्या तारुण्याचा, सौंदर्याचा फायदा आपणांस कशा रीतीनें घेतां येईल हें तो मनांतल्या मनांत अजमावूं लागला.

इतक्यांत अच्युतानंद महाराजांच्या स्नानाची तयारी झाली. शिष्यिणींनीं सुगंधित ऊन पाणी उपसून तयार ठेवलें. शिष्य–शिष्यणींच्या जयजयकारांत व वाद्यांच्या कोलाहलांत स्वामीजी स्नानास बसले. दिवाकर महाराजांचें आंग धुवूं लागला व कांहीं शिष्यिणी त्यांच्या अंगावर पाणी घालूं लागल्या.

थोडया वेळानें महाराजांचें स्नान आटोपलें व ते उठून उभे राहिले. महाराजांस स्नानानंतर लावण्यास गंध पाहिजे होतें ती कामगिरी दिवाकरानें त्या तरुण शिष्यिणीला सांगितली व हळुहळू तिच्याशीं बोलणें वाढविलें. रमाबाईला वाटलें,

' गुरुमहाराजांच्या कृपेस आतां उशीर नाहीं. कारण इतक्या बायकांच्या जमावांत, गंध उगाळून आणण्यास त्यांच्या पट्टशिष्यानें मलाच सांगितलें, आपुलकीच्या भावनेनें तो माझ्याशींच बोलत आहे, हा पट्टशिष्याचा मजवर अनुग्रहच नव्हे काय ? '

समारंभ आटोपला. घरीं परततांना साऱ्या भाविक शिष्य-शिष्यिणींच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. ईश्वरप्राप्तीचें हें स्थान सोडून जातांना त्यांना कमालीचें दुःख झालें. आज अच्युतानंद महाराज आपल्या मुख्य निवासस्थाना-कडे – बेळगांवास – रवाना होणार होते.

त्यांच्या वळवईच्या भक्तगणानें बांधलेल्या ह्या मठांत अच्युतानंद महाराज, वर्षाकांठी एक दोन खेपा येत व कांहीं दिवस प्रेमळ भक्तजनांच्या सहवासांत घालवून परत जात. ह्या खेपेस त्यांचा वाढदिवस होता व शिष्यांच्या प्रेमळ अत्याग्रहावरून ते वर्षचालीप्रमाणें आलेले होते.

समारंभ बहुतेक संपलाच होता. सगळेजण दुःखित अंतःकरणानें महाराजांचा निरोप व आशीर्वाद घेण्यास पुढें झाले. महाराजांना एकदम गहिंवरून आलें.

ते सर्वांना उद्देशून गहिंवरलेल्या आवाजांत म्हणाले,—ईश्वराच्या ठिकाणीं पूर्ण विश्वास ठेवा. तो तुम्हांला कधीही अंतर देणार नाहीं. कसलीही बरी वाईट गोष्ट आचरणांत आणतांना ती ईश्वरार्पण करण्याची आपली तयारी असली म्हणजे तो जगच्चालक प्रभू तुमच्यापासून दूर नाहीं असें समजा.

" आज्ञा महाराज ! " असें उत्तर देऊन त्या सर्वांनीं महाराजांस नमस्कार केले. पट्टशिष्य दिवाकर यानेंहि सर्वांचा निरोप घेतला. सर्वांनीं त्याला वंदन केलें.

दिवाकर रमाबाई जवळ येऊन म्हणाला,—चाललांत माई ?

— होय महाराज. — तिनें त्याला नमस्कार करीत पुढें म्हटलें,

— महाराज ! एक विनंति आहे. तुम्ही आमच्याकडे कांहीं दिवसांसाठीं या केव्हां तरी. तुमच्या पुण्यवान संगतीचा मला फार फायदा होईल.

— अवश्य येईन मी. तुम्ही आपल्या वर्तनानं आम्हांला चटका लावून जात आहां.

दोघांनींही डोळ्यांतून अश्रू काढले. आणि त्यांनीं परस्परांचा मोठ्या कष्टी

अंतःकरणानें निरोप घेतला.



कांहीं दिवसांनंतर दिवाकर महाराज, आपल्या आवडत्या गुरुभगिनीच्या संगतींत कांहीं दिवस घालविण्याच्या हेतूनें तिच्याकडे गेला.

दुपारची वेळ होती. बाहेर ऊन कसें अगदीं रखरखीत पडलें होतें. रमाबाईचा वृद्ध पती त्यावेळीं बाहेर बल्कांवावरच × गुडगुडी ओढीत बसला होता. अकस्मात् दिवाकर महाराजाला दारांत पहातांच, त्यानें लगबगीनें गुडगुडी बाजूस टाकून त्याला अभिवादन केलें व अत्यंत आदरानें आंत नेऊन त्याला खोलींत बसविलें.

रमाबाई इतक्यांतच स्नान उरकून खोलींत येत होती. तिचा तो गौरवर्ण देह भिजलेल्या झिरझिरीत वस्त्रांतून उठून दिसत होता. चालतांना पदाघाताबरोबर तिच्या अवयवांची होणारी हालचाल दिवाकर महाराजाला आकर्षक वाटली. त्याची अभिलाषी नजर तिच्या देहावर स्थिर झाली.

अकस्मात दिवाकर महाराजाला समोर पहातांच ती कितीतरी दचकली, लाजली. तिनें लगबगीनें दुसरीकडे जाऊन नेसण बदललें, कुंकू लावलें नी चोळी घालून ती गुरुबंधूच्या दर्शनास आली.

रमाबाईचा नवरा आतिशय भोळा होता. त्याची वृत्ती अगदीं धार्मिक नी ईश्वरभक्तिपरायण होती. अर्थात् पत्नीचा स्वभाव त्याच्या आवडीप्रमाणें होता. व अशा स्वभावाची धार्मिक पत्नी लाभल्याबद्दल तो परमेश्वराचे मनांतल्या मनांत कितीतरी आभार मानीत होता.

तिनें त्याला नमस्कार केला. दोन्ही हातांनीं त्याचे पाय घट्ट धरून त्यावर आपलें मस्तक टेकलें आणि सद्गदित होऊन म्हटलें,—आपण क्षेम ना ?

— रमाबाई ! तुमची भेट झाल्यानें फार आनंद झाला. गुरुभक्तिणी का थोडया आहेत ? पण परमेश्वरभक्तींत दिवसाचा बराच वेळ मनःपूर्वक वेंचणाऱ्या

---

× गोमंतकांतील बहुतेक घरांना बसण्या–उठण्यासाठीं ओटीसारखा बांधलेला दर्शनी भाग.

तुम्हीच नाहीं का ? अशांच्या संगतींत रहायला मिळणें हें भाग्यच !

या शब्दांनीं रमाबाई खुलून गेली. दिवाकर महाराजांच्या तोंडून असे उद्गार निघावे हा आपला मोठा गौरव होत आहे असें तिला वाटलें.

आपल्या घरांत अच्युतानंद; महाराजांचा पट्टशिष्य आल्याबद्दल तिचें मन विलक्षण आनंदानें भरून गेलें. दिवाकराची सेवा कशा रीतीनें केली असतां त्याची आपल्यावर विशेष कृपा होईल याचा ती मनाशीं विचार करूं लागली.

तिनें त्याच्याकरितां ताबडतोब ऊन पाणी उपसलें व त्याला स्नानास नेलें. स्नान आटोपून दिवाकर देवपूजेचें अनुष्ठान मांडून बसला व रमाबाई त्याच्या जेवणाच्या तयारीला लागली.

देवापुढें बराचसा कापूर उदबत्त्या जाळून त्यानें एकदांची पूजा संपविली व रमाबाईला हांक मारून नैवेद्य व तीर्थ प्राशन करविलें.

थोड्याच वेळांत गुरुबंधु दिवाकर जेवण्यास बसला. आग्रह करकरून तिनें त्याला बरींच पक्वान्नें खावविलीं. तिच्या मुद्रेवर समाधानाची छटा दिसूं लागली.

रात्र झाली. आपल्या एका जुन्या पलंगावर तिनें दिवाकराची शय्या तयार केली. आपण गरीब असल्यामुळें गुरुबंधूची सेवा आपल्या मनाप्रमाणें आपणांस करतां येत नाहीं याचें रमाबाईला पराकाष्ठेचें वाईट वाटत होतें. तरी पण तिनें आपल्या शक्तीबाहेर गुरुबंधूची सेवा चालविली होती.

दिवाकर पलंगावर पहुडला. रात्रीचें सर्व काम धाम आटोपून रमाबाई गुरुबंधूच्या सेवेस हजर झाली. तिनें त्याला मसालेदार दूध प्राशन करण्यास दिलें व विनम्रभावानें ती आपल्या जपाची माळ घेऊन खालीं बसली.

— आज चालून आल्यामुळें पाय कसे अगदीं दुखत आहेत ! —आपल्या तंगड्या खालींवर करीत दिवाकरानें म्हटलें.

— महाराज ! आपली आज्ञा असेल तर मी आपले पाय चुरतें.

— नको ! नको ! कशाला उगीच तुमच्या नाजूक हातांना शीण द्या !

— महाराज ! त्यांत मला मुळींच शीण वाटायचा नाहीं, उलट आनंदच होईल. — इतकें बोलून ती खाटेच्या टोंकाला बसली व दिवाकराचे पाय आदरानें चुरूं लागली.

— महाराज ! ईश्वर प्राप्तीचा सोपा मार्ग आपण मला सांगाल का ?

— रमाबाई ! तुमची ईश्वराच्या ठिकाणीं जडलेली आसक्ति पाहून मला पराकाष्ठेचा आनंद होत आहे. ह्या मर्त्य, क्षणभंगुर, असार संसारांत ईश्वरभक्तीवांचून अन्य तरणोपाय नाहीं.

— आपण खरंच पुण्यवान् आहांत ! — रमाबाई कौतुक मिश्रित आदरानें म्हणाली,—शेंकडों शिष्य असून, महाराजांचा अनुग्रह आपल्यावर उगाच नाहीं झाला ! महाराज ! आपण आपली तयारी कशी केली तें मला सांगाल का ?— रमाबाईच्या प्रश्नांत तिची कळकळ दिसून येत होती.

— परमार्थांत विकार जिंकल्याशिवाय कांहींही होत नाहीं. सगळीं बरींवाईट कर्मे करावयाचीं पण तीं आसक्तिरहित, परमेश्वरार्पण करून करावयाचीं. धर्मग्रंथांच्या वाचनाशिवाय आणि उपासनेशिवाय हें शक्य नाहीं. मन स्थिर आणि शुद्ध असलं म्हणजे हातून कोणतींहि कर्मे घडलीं तरी तें निर्लेप रहातं.

दिवाकर जरी बोलत होता तरी त्याचें लक्ष रमाबाईच्या उन्मादक देहावर लागलें होतें. खिडकींतून पडलेल्या चांदण्याच्या कवडशांत तिचें सौंदर्य तो आपल्या डोळ्यांत सांठवून घेत होता.

— रमाबाई ! तुम्ही सतत ईश्वराच्या सेवेंत मग्न राहून तुमच्या हातून घडं पहाणारीं बरीं वाईट कृत्यें आसक्ति न बाळगतां खुशाल करून जा. व ती भगवान श्रीकृष्णाला अर्पण करा !

या वेळीं रात्रीचे बारा वाजून गेले होते. अष्टमीचें चांदणें खोलीच्या खिडकींतून आंत शिरलें होतें. घराच्या मागें असलेल्या कुळागरांतील पाटाच्या पाण्याची सळसळ स्पष्टपणें ऐकूं येत होती. समोरच्या बांधावरील नारळीच्या झाडांचे उंच शेंडे चांदण्याच्या धवल प्रकाशांत शोभून दिसत होते. लांब—वरपर्यंत दिसणारें हिरवें गर्द शेत व पलीकडचा डोंगर दुरून किती तरी सुंदर दिसत होता. व हें मजेदार दृश्य पलंगावरून उभयतांना दिसत होतें.

दिवाकर अगदीं उल्लूच बनला. त्यानें चटकन उठून रमाबाईला जवळ ओढली व तिचें आवेगाच्या भरांत त्यानें चुंबन घेतलें.

दलदलीच्या भागावर हिरवळ वाढलेली पाहून एखाद्या मार्गस्थानें

निर्धास्तपणें त्यावर पाय ठेवावा व अकस्मात् तो कितीतरी खोल रुतून बसावा म्हणजे जशी त्या पांथस्थाची स्थिति होते अगदीं तशीच रमाबाईची झाली.

ती एकदम चरकली. तिचे अंतःकरण धडधडूं लागलें. झटकन् मागें सरून ती म्हणाली, — महाराज ! हें काय वेडयासारखं ?

— अग ! त्यांत तुला एवढं दचकायला काय झालं ? गुरुमहाराजांनीं त्या दिवशीं दिलेला संदेश तूं इतक्यांतच विसरलीस काय ? आसक्ति न धरतां केलेलं वाईट कृत्य सुद्धां ईश्वराला अर्पण केलं म्हणजे त्याचं पातक कधींही लागत नसतं, समजलीस ?

इतकें बोलून तिच्या प्रतिकाराची पर्वा न करतां त्या चांडाळानें तिला—त्या भोळ्या भाबड्या गुरुभगिनीला एकदम आपल्या हृदयाशीं कवटाळून धरलें.

चांदणें खोलींतून निघून गेलें होतें, व तेल संपल्यामुळें समईचा प्रकाश केव्हांच लुप्त झाला होता. रातकिडयांचा कर्णकटु आवाज बाहेर जोरानें होत होता. व ओटीवर झोंपलेल्या रमाबाईच्या नवऱ्याचें भेसूर घोरणें उभयतांना स्पष्टपणें ऐकूं येत होतें.



— पाहिलंस तूं हें दृश्य ?— चित्रगुप्त म्हणाला.

— होय महाराज !— अच्युतानंद महाराजांचा आत्मा नम्रतेनें म्हणाला.

— राजा राष्ट्र कृतं पापं राज्ञः पापं पुरोहितः । भर्ता च स्त्रीकृतं पापं **शिष्य पापं गुरुस्थितः** ॥ अर्थात व्यभिचाराचं पाप तुझ्या वांट्याला कसं आलं हें समजलं ना तुला आतां ? संशय निरसन झालं ना ?

अच्युतानंदाच्या त्या अंगुष्टमात्र जीवानें आपली मान पश्चात्तापानें खालीं घातली.

**कुळागर**

यमाच्या न्यायासनापुढें
व्यंकटेश अ. पै रायकर

# कल्याणी.

श्री. सां. घ. कंटक.

‘ प्रभा रवीची करी अर्धांगी   ज्योत्स्ना ठेवी विभुच्या अंगीं
लतिकेसी तरुच्या उत्संगीं   जो वसुंधरेशीं योजी अंबरभागा ॥ ’

हें पद अत्यंत मंजुळ आवाजांत कल्याणी गात होती. एखादा चरण संपला कीं ती आपल्या अति कोमल आवाजानें अशी कांहीं तान घेई कीं कुणाचेंही रसिक-हृदय क्षणभर मोहून जावें. मी तर अगदीं देहभानच विसरलों. कल्याणीचें शरीरसौष्ठव आल्हाददायक होतें. तिची झुलती चाल आकर्षक होती. एक प्रकारचें पावित्र्याचें प्रभावी तेज तिच्या सुंदर चेहऱ्यावर विलसत होतें.

तिनें हातांतील तंबोरा गवसणीत घातला व मंद मधुर स्मित करीत ती म्हणाली, — साधारण तरी आवडलं का माझं गाणं ?

— वा ! फार छान ! गायनांतील तुमचं शिक्षण बरंच दिसतं !

— शिक्षण ? छे ! मुळींच नाहीं. पण आमच्या घराण्याची परंपराच अशी कीं त्यामुळं गाणं बजावणं अन् आल्या गेल्याचं मनरंजन करणं हा आमचा नित्य व्यवसायच बनला आहे.

— तरी पण तुमची तयारी बऱ्यापैकीं आहे खास !

— कसली तयारी घेऊन बसलां आहांत तुम्ही ? देवानं दिलेला साधारण गोड गळा आहे म्हणून कांहीं जमतं आहे झालं !

ह्या विषयावर बराच वेळ आम्ही बोलत बसलों होतों. इतक्यांत मध्येंच कल्याणी म्हणाली,— आपण थोडा चहा, सरबत कांहीं तरी...

— हरकत नाहीं. मी थोडा दमून भागूनच आलों आहें.

ती आंत गेली. तेवढयांत मी खोलीचें निरीक्षण केलें. तिची ती लहानशी

खोली अद्यावत् पद्धतीनें नटविली होती. गायन वादनाचीं सारीं साधनें तिथें जय्यत तयार होतींच. वाचण्यासही कांहीं कमी नव्हतें.

तिनें फराळाचें भलें मोठें ताट आणून माझ्यापुढें ठेवलें. आणि किटलींतील चहा ती कपांत ओतूं लागली.

— केवढे श्रम घेतलेत हे तुम्ही ?

— यांतील कांहींच टाकायचं नाहीं बरं का ! त्यांत जास्त असं कांहींच नाही !

— म्हणजे हें कमी झालं का ?

— थोडं नसलं तरी नकोसं वाटणारं त्यांत कांहींच नाही.

बोलतां बोलतां मी चहा संपविला. तिच्या आदरातिथ्यांत आपुलकी होती. ती वेश्या खरी, पण लटकी माया किंवा कृत्रिम चांचल्य हीं मात्र तिच्यांत आढळलीं नाहींत. तिच्या वागण्या – बोलण्यांत सभ्यपणाच्या सीमा संभाळल्या जात होत्या, हें मला स्पष्ट दिसून आलें.

— आपण कुठचे ?— तिनें विचारलें.

— मी शहापूरचा.

— केव्हां आलां आपण इथं ?

— आजच मी गोव्यांत पाय ठेवला, अन् पहिल्यांदा इथंच आलों. गोव्यांत येऊन गेलेले अन् विशेषतः गोमंतक कधींच न पाहिलेले लोक या प्रांताविषयीं मला भय घालीत होते. मोहाचे अनावर क्षण निर्माण करणाऱ्या अप्सरांच्या विलासभूमींत माझ्यासारख्या विधुरानं जाऊंच नये, असं माझ्या मित्रांचं मत. पण अखेर मी आलोंच ! माझ्या भंगलेल्या संसाराची गोष्ट मी तुम्हांला सांगितली तर...

— आपण मला ‘ तुम्ही ’ असं म्हणूं नका !

— तर काय ?

— कल्याणी म्हणा. तूं म्हणा ! आमच्या गोव्यांत ‘ अहो जाहो ’ पेक्षां ‘ अरे तुरे ’ ची भाषाच जास्त वहिवाटलेली आहे. आणि खरं सांगू तुम्हांला ? बहुमानार्थी शब्दांत काय असतं ? जें असतं तें हृदयांतील जिव्हाळ्यांत असतं. आम्ही गोव्यांतील लोक पोक्तपणा, संभावितपणा संभाळायला कदाचित विसरूं, पण माणुसकीची विस्मृति नाहीं व्हायची आम्हांला.

— पण मी कुठं नाकबूल करतों आहें ? गोव्यांतील जनतेची आतिथ्यतत्परता व भावनात्मकता हीं तर अलीकडे भूषणेंच मानलीं जातात. कल्याणी हें असलं बोलणं राहूं दे आतां ! आपण प्राप्त व्यवहाराच्या गोष्टी आधीं बोलूं.

— प्राप्त व्यवहाराच्या ?— कल्याणीनें जरा आश्चर्यानेंच विचारलें.

— हो. कल्याणी, एखादं नवीनच बांधलेलं नयनरम्य घर अकस्मात् कोसळावं व आंतील माणसं निराधार व्हावींत तशी माझी अवस्था झाली आहे. माझं लग्न होऊन अवघीं दोनच वर्षं झालीं. इतक्यांत माझ्या संसाररथाचं एक चाक निखळलं ... कायमचं गेलं. माझ्या आतांच्या एकलकोंड्या आयुष्याला पूर्वीचं सुखद वळण लावायला मनाजोगती जोडीदारीण घरांत आणणं मला कांही कठीण नाहीं. पण...कल्याणी, समज मी जर दुसरं लग्न केलं, अन् लाभलेली नवी अर्धांगी स्वभावानं वाईट असली तर त्या विवाहांत सौख्य कसलं ?

— मग काय करायचं ठरविलं आहे आपण ?

— अशाच कुणातरी स्त्रीच्या मायापाशांत स्वतःला गुरफटवून घेऊन संसाराचा सुखानुभव घ्यायचा मी निश्चय केला आहे. अन् तेवढ्यासाठीं मी इथं मुद्दाम आलों आहें. कल्याणी, आणखी स्पष्ट बोललं पाहिजे का ?

— आपला उद्देश इथं सफळ होत नाहीं याबद्दल मला फार वाईट वाटतं. मी वारांगना असलें, तनुविक्रय हा आमचा पिढीजाद धंदा असला तरी मी शीलानं अजून निर्मल आहें.....कां ? असे दचकलांत कां ? माझ्या सांगण्यावर विश्वास बसत नाहीं का आपला ?

— तसं नव्हे कल्याणी. तुझ्यावर विश्वास आहे माझा. पण तुमच्या जातींतील हा दिलाचा सच्चेपणा थोडा नवीनच...चमत्कारिकच वाटला मला.

— हो. खरं आहे तुमचं म्हणणं. पुरुषवर्गाला आपल्या रंगढंगांनीं आणि श्रृंगारचेष्टांनीं भुलवून त्यांजपासून जास्तींत जास्त पैसा काढणं हा वेश्यांचा धर्म आहे असं समजलं जातं. पण वेश्यां वेश्यांमध्यें फरक आहे. कदाचित मी सुद्धां एक धंदेवाईक वेश्या बनणार होत्यें. पण विधिघटनेनं मला सदसद्विवेक बुद्धीचा पुरवठा केला, अन् मी पवित्र राहिलें.

— अशी कोणती ती विधिघटना ?

— सांगत्यें. तीच गोष्ट सांगत्यें मी आपणांला. मी ज्यावेळीं वयांत आलें त्या वेळी धनाढ्य कासुकांच्या झुंड्या माझ्याकडे वळल्या. रोगी असो कीं म्हातारा असो. जो जास्त पैसे देईल त्याला मी माझी काया अर्पण करावी असा आईचा सल्ला होता. पण तो झुगारून देऊन मी मला आवडणाऱ्या एका २५–३० वर्षाच्या गरीब तरुणाशीं संबंध ठेवला.

— पण तुझ्या आईला हें तुझें वागणं आवडलं कां ?

— छे ! मुळींच नाहीं. त्यांची संगति सोडण्याबद्दल तिनं आधीं गोडीगुलाबीनं सांगितलं. नंतर रुसली–फुगली. पण माझं एकच उत्तर होतं. जोंपर्यंत ते मला अंतर देणार नाहींत तोंपर्यंत पैशाच्या मोहानं प्रेमाचा धागा मी तोडणार नाहीं. आणि त्यांचं माझ्यावरील प्रेम अस्सल होतं हें कळण्याचा योगही सुदैवानं लवकरच आला.

— कोणता तो प्रसंग ?–मी अधीरतेनें विचारलें.

—मला टायफॉईड ताप आला. माझ्या जगण्याची आशा सोडून घरांतल्या फालतु मंडळींनीं बाहेर जावं असं डॉक्टरनी सांगितलं. आईशिवाय बाकीचीं माणसं निघून गेलीं. पण माझ्या प्रियकरानं प्रयत्नांची पराकाष्टा केली, रात्रीचा दिवस केला नी मला जीवदान दिलं. ज्यावेळीं मला स्मृति येई त्यावेळीं माझ्यापासून दूर जाण्याबद्दल मी त्यांना कळवळ्यानं सांगत असें. अन् ते आपले डोळे पुशीत उत्तर देत, " कल्याणी, एवढी निष्ठुरता माझ्यांत खास नाहीं. तूं अशा निराधार स्थितींत असतां मी तुला सोडून जाऊं ? जो दुःखांत भागीदार असतो, त्यालाच अधिकारानं सुखाची भागीदारी घेतां येते, नाहीं का ! "

त्यांच्या माझ्यावरील प्रेमाची मला पुरी जाणीव झाली. अन् म्हणून धनलोभाला मोहवश न होतां त्यांच्याशीं एकनिष्ठेनं वागण्याचा मी मनःपूर्वक प्रयत्न करीत आहें. आणि जोंपर्यंत एकाशीं करार आहे तोंपर्यंत त्याच्याशीं एकनिष्ठेनं वागणं हें वेश्येचं झालं तरी कर्तव्यच आहे ! मध्यंतरी मला त्यांच्याकडून एका पैचीही प्राप्ति होईनाशी झाली. ते ज्या कंपनींत नोकरीला होते ती कंपनीच बंद झाल्यानं त्यांच्या प्राप्तीचीं सारीं दारं बंद झालीं. त्यावेळीं ते मला म्हणाले, " कल्याणी, प्रेमाचा हा प्रामाणिकपणा आतां पुरे कर. मजकडून अल्पही

मदतीची आशा नसतांना तूं इतर पुरुषांबद्दल बेफिकिरी दाखवितेस. अशानं तुझा प्रपंच कसा चालेल ? "

— " मग परपुरुषांशीं कामचेष्टा करायला तुम्ही मला सांगतां का ? माझी हीच का तुम्ही पारख केली ? "

— " छे ! छे ! तसं नव्हे कल्याणी. तुझ्या पावित्र्याचं मला आदरपूर्ण कौतुक वाटतं. पण मजकडून एका पैशाचीही कमाई तुला होत नसतांना, उलट तुझ्या उत्पन्नाच्या मार्गांतील धोंड होऊन तुझ्या सुखाच्या संसाराचा बेरंग करण्यास मीं कारणीभूत व्हावं, ह्या जाणीवेनं माझा जीव एकसारखा जळत आहे. "

— अन् त्यांच्या या बोलण्याला उत्तर देतांना मी म्हणालें, " सुख ? माझं सुखसर्वस्व तुम्ही आहांत. "

इतकें सांगून कल्याणीनें एक सुस्कारा सोडला. जणुं काय तिच्या हकीगतीचा तो पूर्ण विरामच होता.

माझी स्त्री-सहवासाची लालसा कल्याणीपासून कांहीं तृप्त होऊं शकत नाहीं, याचा मला बोध झाला.

त्यावेळीं रात्रीचे दहा-साडेदहा वाजले होते. पौर्णिमेचें शुभ्र चांदणें सृष्टींत आल्हाद ओतीत होतें. जिकडे तिकडे आनंदी आनंद होता. आणि अशा वेळीं माझें मन आशाभंगानें त्रासून गेलें होतें.

बराच वेळपर्यंत टिकलेली स्तब्धता कल्याणीला रुचली नाहीं. ती म्हणाली, —मोठ्या आशेनं माझ्या घरीं आलेल्या पाहुण्याला परत पाठवायला माझ्या जिवावर येतं. माझं हें कृत्य आपल्याला उपमर्दकारक वाटूं नये म्हणून माझी रहस्य–कथाही मला आपणांस सांगावी लागली.

— कल्याणी, गोमंतकांत प्रवेश करतांच तुझ्यासारखी स्त्री मला विचार-विनिमयासाठीं भेटली हें मी माझं भाग्य समजतों. तुझ्यासारख्या शीलवती वेश्येच्या प्रियकराच्या थोर भाग्याचा मला हेवा वाटतो. तुम्ही दोघेही आनंदांत रहा. मोहाचा प्रसंग उत्पन्न करून तुझ्या अमृततुल्य सुखांत मिठाचा खडा टाकण्याइतका मी अधम नाहीं.—असें म्हणून दहा रुपयांची नोट मी तिच्या हातीं दिली. ती परत माझ्या हातांत देत कल्याणी म्हणाली,

— हें काय ?

— असूं द्या. मोबदला म्हणून...माझी आठवण म्हणून !

— आपल्याकडून मोबदला घ्यायचा अधिकार मला कुठं आहे ? मीं आपल्यासाठीं काय केलं आहे ?

— तुझं गाणं मी ऐकलं नाहीं का ?

— पण ते आपण यायच्या पूर्वीपासून मी म्हणत होतें.

— तुमचा एवढा वेळ...चहा-फराळ...

— च्...च्...तो गृहस्थाश्रम आहे.

— कल्याणी, ही एवढी नोटही तूं न घेतली तर मला अत्यंत वाईट वाटेल.

तिनें ते पैसे मोठ्या नाखुषीनें घेतले. ती म्हणाली,– आपण इथंच राहतां? का कुठं जायचं आहे आपल्याला ?

— मी तर इथं नवखा आहें. अन् पणजी–मडगांवला जाईन म्हटलं तर अशा अपरात्रीं मोटर कशी मिळणार ? मी इथं एका विशिष्ट हेतूनंच आलों होतों...तो माझा हेतु पुरा करूनच जावं...

— स्पष्टच सांगा ना आपल्याला काय म्हणायचं आहे तें !

— माझ्या इच्छापूर्तीसाठीं तुझ्या परिचयाच्या दुसऱ्या कोणाकडे तरी मला पाठव ना !

— काय सांगतां तुम्ही हें ?

— कल्याणी, तुझ्या निर्मल वर्तनानं इकडील वेश्यांविषयीं माझा ग्रह अनुकूल झाला आहे. गोमन्तकाबाहेर मुंबईला व इतर ठिकाणीं गोव्यातून येणाऱ्या वेश्यांना एवढी मागणी कां असते तें मला आतां समजलं. प्रामाणिकपणा एकनिष्ठता, खरं प्रेम, कलेची आसक्ति व तींत तयारी, आतिथ्यप्रियता व गोड नी प्रेमळ भाषण, ह्या गुणांचा सांठा तुमच्यापाशीं असल्यामुळं तुमच्याविषयीं तिकडे चांगला ग्रह झाला आहे. अन् म्हणूनच पुन्हां लग्न करून संसाराच्या गाड्याला जुंपून घेण्यापेक्षां एकाद्या रुपवती व प्रेमळ वेश्येच्या सहवासांत...

— खरं सांगूं का आपल्याला ? वेश्या हें नकली मोतीं आहे. खऱ्या मोत्याची सर त्याला कशी येईल ? मी एखाद्या वेश्येशीं आपली ओळख करून

दिली, अन् ती आपल्याशीं प्रामाणिक राहिली तरीही खरं सुख आपल्याला मिळेल, असं नाहीं मला वाटत !

— मग मी असाच परत जाऊं म्हणतेस ?

— हो. आपल्या सुखाचा प्रश्न आपण पुन्हां लग्न करूनच सोडवला पाहिजे. वेश्या म्हणजे सोडतीचा पैसा ! सोडतीचा पैसा जसा नेहमींच निष्फळ ठरतो...

तिनें अशा किती तरी उपदेशाच्या गोष्टी मला सांगितल्या. आणि ह्या गोष्टी एका वेश्येच्या मुखांतून मी ऐकतों आहें ह्या जाणीवेने माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

दुसऱ्या दिवशीं तिचा निरोप घेऊन मी पणजीला आलों, आणि सर्व्हीसची मोटार गांठून संध्याकाळीं बेळगांवला येऊन थडकलों

थोडयाच महिन्यांनीं एका सुंदर नी सुशील मुलीशीं मी विवाहबद्ध झालों. आणि नूतन पत्नीचें नांव मुद्दां कल्याणीच ठेवलें. प्रत्येक भाऊबीजेला गोव्यांतील माझ्या सन्मार्गदर्शक कल्याणीला मी भेट पाठवतों. लग्नानंतरच्या पहिल्याच भाऊबीजेच्या दोन दिवस पूर्वी भेटीचें पार्सल बांधीत असतां माझ्या पत्नीनें मला विचारलें, — इकडे तर बहीणच नाहीं. मग ही कोणती बहीण काढली शोधून ?

— गोव्यांत माझी एक मानलेली बहीण आहे. तिचं नांव कल्याणी !

— कल्याणी ! अन् तेंच नांव मला ?

— अग, तिच्या उपदेशामुळें तर तुझ्याशीं लग्न करून हे सुखाचे दिवस मी पाहतों आहें.—अन् त्या ओघांतच सारी हकीकत मी तिला सांगून टाकली.

दरवर्षी दीपावलीच्या सुमारास कल्याणीची गोष्ट आमच्या घरीं निघेच. आणि त्यावेळीं माझी पत्नी म्हणे,—त्या तुमच्या गोव्यांतल्या कल्याणीचं कल्याण होवो !

कल्याणी
सां. घ. कंटक

